


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका : 'भाषा आणि जीवन'**
**विद्वत्प्रमाणित नियतकालिक**

आर.एन.आय. ४००४८/८ ISSN 2231-4059

**संपादक :** प्र० ना० परांजपे, एच्-1, क्लॅरियन पार्क, पुणे 411067. **(M) 9422509638**
इ-पत्ता : pranaparanjpe@gmail.com.



**प्रकाशक, मुद्रक व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता -**
आनन्द काटीकर, बी-5/16 , सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411051. संपर्क : **94216 10704**
**marathi.abhyas.parishad@gmail.com**

**मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411051. स्थिरभाष : (020) 2434 8756

**प्रकाशन : त्रैमासिक :**

हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर)

**वर्गणीचे दर**

| | वार्षिक | त्रैवार्षिक | पंचवार्षिक |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | १५०/- | ४००/- | ७००/- |
| संस्था : | २००/- | ५५०/- | ९००/- |

**आजीव सभासदत्व-व्यक्तींसाठी** : रु० २,१००/-
या अंकाची किंमत : रु० ४०/-

**जाहिरातीचे दर**

| पूर्ण पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|
| २,५००/- | १,५००/- | ८००/- |

**वर्गणी थेट बँकेत भरण्यासंबंधी सूचना**
खातेधारकाचे नाव : मराठी अभ्यास परिषद
खाते क्रमांक : 2005 716 4260
बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र
शाखा : टिळक मार्ग, पुणे
**IFSC : MAHB 0000041**
बँकेत वर्गणीचे पैसे भरल्यावर कृपया ९९२३६ ७१८२० किंवा ९४२१६१०७०४ या क्रमांकावर लघुसंदेश पाठवावा, अथवा पत्र किंवा इ-पत्र पाठवावे आणि आपले **नाव, पत्ता, वर्गणीची रक्कम, कालावधी इ० तपशील कळवावा.**

**सूचना :**
(१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या लेखांतील मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असेलच, असे नाही.
(२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांच्याकडून अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ आणि राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.











# मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन
## वर्ष ३४, अंक ३ : पावसाळा २०१६

**अनुक्रमणिका**




मुखपृष्ठ : सलिल वाघ

[ मुखपृष्ठावरील डॉ० सुमन्त मंगेश कत्रे यांचे छायाचित्र डॉ० सुजाता महाजन, 'अमेरिकन इन्स्टिट्युट ऑफ इंडियन स्टडीज्'मध्ये मराठी-प्रकल्प-प्रमुख यांच्या प्रयत्नामुळे उपलब्ध झाले. ]

पान ५ वरील रेखाचित्र : गिरीश सहस्रबुद्धे


---

# मराठीच्या दस्तऐवजांचे पाठ्यपुस्तक

गेली काही वर्षे मराठीच्या अभिजात दर्जाविषयी धूम चालू आहे. तमीळ, तेलुगू, कन्नड इ० भाषा 'अभिजात' दर्जाच्या आहेत असे केंद्र सरकारने अधिकृतपणे मान्य केल्यानंतर मराठीच्या अभिमान्यांना मराठीही अभिजात दर्जाची आहे, असा साक्षात्कार झाला आणि तो सिद्ध करण्यासाठी धावाधाव सुरू झाली. महाराष्ट्र शासनाने एक समिती नेमली - त्या समितीने अनेक दस्तऐवज पडताळून एक अहवाल तयार करून शासनाला सादर केला आणि महाराष्ट्र शासनाने तो अहवाल त्याच्या इंग्रजी भाषांतरासह केंद्र शासनाकडे पाठवला. केंद्र शासनाने तो अहवाल तज्ज्ञ अभिप्रायासाठी 'साहित्य अकादेमी'कडे पाठवला. अशी बातमी आहे की साहित्य अकादेमीने तो स्वीकारला आणि मराठी ही अभिजात भाषा आहे, असा अभिप्राय केंद्र शासनाकडे पाठवला. या बातमीलाही आता एक वर्ष उलटून गेले आहे. पण मराठीच्या अभिजात दर्जाची घोषणा अद्यापि झालेली नाही.

पण आपणही स्वस्थ बसून उपयोग नाही. केंद्र शासनावर लोकमताचा दबाव आणला पाहिजे, असा युक्तिवाद केला जात असून त्यासाठी अनेक उपाय सुचवले जात आहेत. पंतप्रधान नरेंद्र मोदींना लाखो पत्रे पाठवणे, पत्रांचा पाऊस पाडणे हा त्यापैकी एक उपाय आहे असे सुचवले गेले आणि शाळा-महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांकडून पत्रे लिहून घेण्याचा उपक्रमही काही ठिकाणी करण्यात आला; पण हे वरवरचे, स्वत:चे समाधान करून घेणारे उपाय आहेत. यापेक्षा अधिक समंजस, दीर्घकालीन व सामान्य माणसाला मत बनवण्यासाठी ठोस साहाय्यभूत ठरतील असे उपक्रम आवश्यक आहेत, यात शंका नाही.

''मराठीचे वय १५०० ते २००० वर्षांपेक्षा जास्त असल्याचे सांगणारे किमान ८० ग्रांथिक पुरावे आहेत.'' असे अभिजात भाषा समितीचे म्हणणे आहे. पण सामान्य मराठी माणसाला त्यांच्याबद्दल काही माहिती आहे का? निदान मराठीच्या प्राध्यापकांना व पदव्युत्तर विद्यार्थ्यांना तरी ते माहीत आहेत का? याचे उत्तर बहुश: 'नाही' असेच येईल. कारण या ८० ग्रांथिक पुराव्यांपैकी फारच थोड्या ग्रंथांचा मराठीच्या अभ्यासक्रमात आतापर्यंत समावेश झालेला आहे. मराठीचे अभ्यासक्रम 'सोपे' करण्याच्या हेतून प्राचीन मराठीचा अभ्यास बाजूला ठेवण्यात आला आहे, किंवा त्याला अन्य विकल्प देण्यात आले आहेत.

या संदर्भात इंग्रजीचे उदाहरण देण्यासारखे आहे. १९६०च्या दशकापर्यंत

एम०ए०च्या अभ्यासक्रमात 'संपूर्ण' इंग्रजी - म्हणजे सर्वच्या सर्व आठ पेपरसाठी - इंग्रजी घेणाऱ्या विद्यार्थ्यांना 'ओल्ड इंग्लिश' व 'मिड्ल इंग्लिश' अशा दोन प्रश्नपत्रिकांचा अभ्यास करावा लागे. 'ओल्ड' इंग्लिश' ही भाषा वस्तुत: 'अँग्लो सॅक्सन' होती; तिची लिपीही वेगळी होती. पण त्या प्रश्नपत्रिकेचा अभ्यास केलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला इंग्रजी भाषा सातव्या-आठव्या शतकापासून अस्तित्वात होती, वापरात होती याची खात्री पटत असे - केवळ इतिहासाच्या पुस्तकांतील विधाने वाचून अशी खात्री कधीच पटत नाही!

मराठीच्या प्राचीन लेखनातील उताऱ्यांचा समावेश असलेले असे एक तरी पाठ्यपुस्तक आज अस्तित्वात आहे का? निदान असे पाठ्यपुस्तक असावे असे तरी कुणी म्हटले आहे का? संस्कृत नाटकांत काही गौण पात्रांच्या तोंडी ज्या प्राकृत भाषा आहे ती जुनी मराठी आहे असा युक्तिवाद केला जातो. सातवाहनाची 'गाथासप्तशती' ज्या प्राकृत भाषेत आहे ती प्राकृत भाषाही मराठीचे जुने रूप आहे, असे म्हटले जाते. एवढेच नव्हे तर या गाथा सातवाहनाने लिहिल्या असे नसून लोकांमध्ये प्रचलित असणाऱ्या गाथा (=गाणी?) गोळा करून त्याने त्या एकत्र गुंफल्या (आणि म्हणून त्याही पूर्वी त्या रचल्या गेल्या असल्या पाहिजेत.) असे तज्ज्ञ म्हणतात. पण गाथासप्तशतीचे एखादे पान तरी विद्यार्थ्यांपर्यंत पोचते काय? तेराव्या शतकातली 'कथासरितसागर' ही संस्कृत रचना त्यापूर्वी हजारबाराशे वर्षे गुणाढ्याने लिहिलेल्या 'बृहत्कथे'चे भाषांतर आहे आणि बृहत्कथा प्राकृतात (=जुन्या मराठीत) होती, म्हणून मराठीत दोन हजार वर्षांपासून ग्रंथरचना होत आहे असा युक्तिवाद केला जातो. शिवाय ताम्रपट, शिलालेख यांचाही उल्लेख केला जातो.

पण हे सारे विद्यार्थ्यांपर्यंत, म्हणजे पर्यायाने सामान्य माणसापर्यंत पोचले पाहिजे, असे आत्तापर्यंत कुणाला कधी सुचले आहे का? विद्यापीठांच्या मराठी विभागांनी अशा एखाद्या प्रश्नपत्रिकेचा अभ्यासक्रमात समावेश केला आहे का? मराठीच्या अभिजातपणाची ग्वाही देणाऱ्या ८० ग्रंथांतील कमीजास्त लांबीचे - अगदी काही ओळींपासून काही पानांपर्यंतचे - उतारे असलेले पाठ्यपुस्तक - निदान राज्य मराठी विकास संस्थेने तरी तयार करायला नको का? अर्थात त्या उताऱ्यांच्या काळातील महाराष्ट्राची स्थिती व ते लेखक यांचा मोजक्या शब्दांतील परिचय, शब्दार्थ आणि आजच्या मराठीतील त्या उताऱ्यांचे भाषांतर यांचा समावेश त्या पाठ्यपुस्तकात असायलाच हवा. मराठीच्या आद्य रूपांचा परिचय असला तर सामान्य माणसाला मराठीच्या अभिजात दर्जाची मागणी करणारी पत्रे लिहायला सांगावे लागणार नाही; तो ते किंवा अन्य काही उत्स्फूर्तपणाने करेल आणि आपोआपच राज्यकर्त्यांवर दबाव येईल. ■





अनुक्रमणिका



# डॉ० सुमन्त मंगेश कत्रे

- म० अ० मेहेंदळे

डॉ० कत्रे यांचे प्राथमिक-माध्यमिक शिक्षण मंगलोरला, आणि कॉलेज शिक्षण मद्रासला झाले. शाळेत शिकत असतानाच त्यांनी पाणिनीच्या अष्टाध्यायीचे अध्ययन शास्त्रीबुवांकडे पारंपरिक पद्धतीने केले. पुढे कॉलेजात बी०ए० पदवीसाठी त्यांनी गणित विषय निवडला. ती पदवी मिळाल्यावर त्याच विषयात उच्च अध्ययन करून केंब्रिज विद्यापीठाची गणित विषयातील पदवी संपादण्याचा त्यांचा मनोदय होता. परंतु केंब्रिज विद्यापीठात प्रवेश मिळवण्यासाठी आवश्यक ती हिंदुस्थानातून पाठविलेली कागदपत्रे दैवगतीने त्यांना वेळेवर मिळाली नाहीत आणि त्यामुळे त्यांना प्रवेश घेता आला नाही. ते लंडनच्या 'स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज'मध्ये गेले. पूर्वी केलेल्या संस्कृतच्या अभ्यासाच्या जोरावर त्यांनी त्या संस्थेत प्रवेश मिळवला आणि प्रथम तिथल्या आवश्यक त्या परीक्षा देऊन डॉ० विल्यम स्टेड यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच्०डी० पदवीसाठी अभ्यास सुरू केला. संस्कृतबरोबरच डॉ० कत्र्यांनी पाली-प्राकृत आणि जर्मन-फ्रेंच या भाषांचाही अभ्यास केला. त्याचबरोबर प्रा० टर्नर यांच्या इंडो-युरोपियन भाषाकुलावरील व्याख्यानांनाही ते हजर असत. त्यांचा पीएच्०डी०-प्रबंधाचा विषय ''प्रारंभिक बौद्ध कथाकाव्ये आणि प्राचीनतर उपनिषदांशी त्यांचे नाते'' (अर्ली बुद्धिष्ट बॅलड्स अँड देअर रिलेशन टु दि ओल्डर उपनिषद्स) असा होता. १९३१ साली लंडन विद्यापीठाची पीएच०डी० पदवी मिळवून ते भारतात परत आले.

डॉ० कत्रे भारतात परतले तेव्हा प्राचीन भारतीय भाषांचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास हा त्यांचा शैक्षणिक विशेष होता. पण त्या काळात मुंबई प्रांतात भाषाशास्त्राचे अध्यापन, संशोधन करण्याची सोय कुठेही नव्हती. तेव्हा पहिली काही वर्षे त्यांनी पुण्याच्या नवरोसजी वाडिया कॉलेज आणि सर परशुरामभाऊ कॉलेज ह्या मुंबई विद्यापीठाशी संलग्न असलेल्या दोन महाविद्यालयांत संस्कृत व प्राकृत भाषा शिकविण्याचे काम केले. पुढे १९३९ साली एकेकाळी पदवीपूर्व अभ्यासक्रम शिकवणाऱ्या डेक्कन कॉलेजचे





अनुक्रमणिका

रूपांतर पदव्युत्तर आणि संशोधन संस्थेत झाले आणि डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट अँड रिसर्च इन्स्टिट्यूट ह्या नव्या नावाने ती अस्तित्वात आली. ऑगस्ट सतरा तारखेस नव्या संस्थेत प्राध्यापकांनी आपापली पदे स्वीकारली. तेव्हाच्या पहिल्या सात प्राध्यापक-प्रपाठकांत डॉ० कत्रे इंडोयुरोपिअन फिलॉलॉजी या विषयाचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले आणि त्यांच्या साऱ्या आयुष्यास कलाटणी मिळाली. डॉ० कत्रे यांच्या कल्पकतेस, संयोजनकौशल्यास, संशोधनाची नवनवीन क्षेत्रे हेरण्यास त्यांना डेक्कन कॉलेजात भरपूर वाव मिळाला. पुण्याला प्रारंभी महाविद्यालयातून डॉ० कत्रे शिकवत होते. तेव्हा त्यांचा प्रा० पी०के० गोडे आणि डॉ० व्ही०एम० सुखटणकर यांच्याशीही संबंध आला. हा संबंध डॉ० कत्रे यांच्या पुढील कार्याच्या दृष्टीने फार मोलाचा ठरला. प्रा० गोडे यांच्या सहकार्याने त्यांनी 'न्यू इंडियन अँटिक्वेरी' आणि 'ओरिएंटल लिटररी डायजेस्ट' ह्या दोन नियतकालिकांचे संपादन सुरू केले. प्राचीन भारतीय विद्येविषयीचे संशोधनपर लेख प्रसिद्ध करणाऱ्या 'इंडियन अँटिक्वेरी' ह्या नियतकालिकाचे प्रकाशन बंद पडले होते. प्रा० गोडे आणि डॉ० कत्रे यांनी त्या नियतकालिकाचे 'न्यू इंडियन अँटिक्वेरी' ह्या स्वरूपात पुनरुज्जीवन केले. डॉ० सुखटणकर हे त्या वेळी महाभारताच्या संशोधित आवृत्तीच्या प्रमुख संपादकाचे काम करीत होते. त्यांच्याशी संबंध आल्यामुळे डॉ० कत्रे यांना पाठचिकित्सापद्धती या एका नव्या संशोधन क्षेत्राची चांगली माहिती मिळाली.

डॉ० कत्रे यांची डेक्कन कॉलेजात नेमणूक झाली तेव्हा प्रारंभी तिथे तीन प्राध्यापक आणि पाच प्रपाठकांची पदे होती. तीन प्राध्यापकांपैकीच एकाची संस्थेच्या संचालकपदी नियुक्ती करायची अशी योजना होती. काही कारणांमुळे ह्या तिघांपैकी कोणाचीही नियुक्ती संचालकपदी न झाल्याने वर्षभर ते पद रिक्त राहिले. दुसऱ्या वर्षाच्या आरंभी (जून १९४०) डॉ० आय०जे०एस० तारापोरवाला यांची संचालक म्हणून निवड झाली. डॉ० तारापोरवाला यांचा अभ्यासविषयही इंडोयुरोपिअन फिलॉलॉजी हाच असल्याने आणि त्या विषयाच्या दोन प्राध्यापकांची मूळ योजनेत तरतूद नसल्याने एका वर्षातच डॉ० कत्रे यांना डेक्कन कॉलेज सोडायची वेळ आली होती. परंतु डॉ० कत्रे यांची योग्यता आणि विशेष म्हणजे नव्याने उभ्या राहणाऱ्या संशोधनसंस्थेस त्यांची उपयुक्तता यांची कल्पना पहिल्याच वर्षी संस्थेच्या प्रशासक मंडळाला आली होती, म्हणून त्यांनी डॉ० कत्रे यांना संस्था सोडावी लागू नये यासाठी एक अतिरिक्त प्राध्यापकाचे पद मंजूर केले आणि डॉ० कत्रे त्यांच्या जागेवर टिकून राहिले. डॉ० तारापोरवाला यांनी दोन वर्षांतच संचालक पदाचा राजीनामा दिला आणि त्या पदावर डॉ० कत्र्यांची नेमणूक निवड समितीने केली (१९४२). त्या पदावरून डॉ० कत्रे १९७१ साली, म्हणजे सुमारे तीस वर्षांनी निवृत्त झाले. इतका दीर्घकाळ संस्थेची धुरा सांभाळणारे डॉ० कत्रे हे एकमेव संचालक. मिळालेल्या संधीचा सदुपयोग करून डॉ० कत्रे यांनी संस्थेचा

विस्तार केला, आपल्या स्वत:च्या विभागाबरोबरच इतरही संशोधन विभागांच्या विकासाला पूर्ण वाव दिला, आणि संस्थेला आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा मिळवून दिली.

डेक्कन कॉलेजला मानाचे हे स्थान मिळवून देण्याचे काम डॉ० कत्र्यांनी लहान-मोठ्या अनेक उपक्रमांद्वारे केले. त्यातला पहिला आणि प्रदीर्घ काळ चालणारा महत्त्वाचा उपक्रम म्हणजे संस्कृत भाषेच्या ऐतिहासिक महाकोशाची रचना (एन्सायक्लोपेडिक डिक्शनरी ऑफ संस्कृत ऑन हिस्टॉरिकल प्रिन्सिपल्ज) अशा प्रकारचा कोश तयार करण्याचे स्वप्न डॉ० कत्र्यांनी डेक्कन कॉलेजात प्रवेश केला तेव्हाच पाहिले असावे. त्यांची कल्पना फार भव्य होती आणि ती कृतींत उतरवायची तर त्यासाठी फार मोठ्या द्रव्यबळाची आणि अनुभवी, कार्यक्षम संशोधकांच्या साह्यांची आवश्यकता होती. डेक्कन कॉलेजच्या प्रारंभीच्या अवस्थेत तेव्हाच्या मुंबई सरकारकडून वार्षिक फक्त पंचाहत्तर हजारांचे अनुदान मिळत असे. त्यातून संस्थेचा सर्व कारभार-शिक्षकांचे पगार, व्यवस्थापन-खर्च, ग्रंथालयाची वाढ - चालवायचा असल्याने ह्या तुटपुंज्या रकमेत संस्कृतचा बृहत्काय कोश उभारू पाहणे म्हणजे खरोखरच स्वप्न पाहणे होते. परंतु डॉ० कत्रे यांचा एक स्वभावविशेष असा होता की अडचणींचा फार मोठा बाऊ न करता आणि एखाद्या प्रकल्पाची आधी संपूर्ण तयारी होण्याची वाट न पाहता ते तो प्रकल्प लहान प्रमाणात सुरू करीत आणि त्याची उपयुक्तता प्रशासनाला पटली की त्याची हळूहळू वाढ होऊ लागे. कोशाच्या बाबतीत असेच झाले. १९४२ साली संचालकपदाची सूत्रे हाती घेतल्यावर काही महिन्यातच त्यांनी 'हिस्टॉरिकल डिक्शनरी ऑफ इन्स्क्रिप्शनल संस्कृत' ह्या एका लहान कोशाच्या रचनेचे काम सुरू केले. त्यासाठी संस्कृत शिलालेखांतले शब्द गोळा करण्यासाठी दोन सहायक नेमले (त्यांतला एक मी होतो.) डॉ० कत्रे यांच्या बृहत्कोशाची कल्पना यदाकदाचित् कार्यान्वित झाली नसती तरी त्यांनी कल्पिलेल्या ह्या मर्यादित स्वरूपाच्या कोशाची आवश्यकता होती, कारण पूर्वीच्या संस्कृत कोशकारांनी संस्कृत शिलालेखांकडे संपूर्ण नसले तरी बरेचसे दुर्लक्ष केले होते. हा लहान कोश मर्यादित द्रव्यसाह्यावर आणि नियतावधीत पूर्ण करणे शक्य होते. ह्या कोशाचे शब्द गोळा करण्याचे काम जवळजवळ पूर्ण होण्याच्या सुमारास डॉ० कत्र्यांना त्यांच्या मोठ्या कोशाची बैठक जमविण्यात यश आले आणि मग त्या मोठ्या कोशाच्या शब्दसंग्रहात त्या लहान कोशाची सामग्री संक्रमित करण्यात आली. मोठ्या कोशासाठी बसवलेल्या बैठकीची पुढे काही रूपांतरे होऊन अखेर डेक्कन कॉलेजात सध्या काम करीत असलेला स्वतंत्र संस्कृत कोशविभाग अस्तित्वात आला.

संस्कृतचे काही चांगले कोश पूर्वीही उपलब्ध होते. आजवरच्या संस्कृत संशोधनासाठी त्यांचाच उपयोग होत आला आहे. परंतु संस्कृत भाषेत उपलब्ध असलेल्या वाङ्मयाची समृद्धी पाहता पूर्वीच्या कोशांची आधारासाठी घेतलेले सुमारे

पाचशे ग्रंथ ही संख्या फार लहान म्हणावी लागेल. डॉ० कत्रे यांनी कल्पिलेल्या कोशाची आधारभूत ग्रंथसंख्या पंधराशे आहे. ह्या ग्रंथांची निवड करून त्या आधारे कोशाचा किमान कार्यक्रम प्रसिद्ध करण्याचे पहिले काम बव्हंशी पॅरिसचे प्रा० लुई रनू (Louis Renou) यांनी केले. त्यांनी केलेल्या निवडीनुसार ह्या ग्रंथातील शब्दकोशासाठी कार्डावर संदर्भ व उदाहरणांसह लिहून काढण्याचे काम लगेचच सुरू झाले. ह्या कामाचा व्याप हळूहळू वाढू लागला आणि कोशाविभागात काम करणाऱ्यांची संख्याही वाढू लागली. त्या वेळचा संस्कृत कोश विभाग म्हणजे भारतातील निरनिराळ्या संस्कृत पंडितांचे रोज भरणारे एक संमेलनच असे. डॉ० कत्रे १९७१ साली डेक्कन कॉलेजातून निवृत्त झाले तेव्हा हे प्रारंभीचे काम पुष्कळसे, वेदविभाग वगळता, पूर्ण झाले होते. आधीचे उरलेले काम पूर्ण करण्याचे, सर्व कार्डे अकारविल्हे लावण्याचे, कार्डावरील माहितीच्या आधारे शब्दांचे अर्थ निश्चित करण्याचे आणि त्यांच्या कालानुक्रमे होणाऱ्या विकासाची जुळणी करण्याचे असे हे अतिशय महत्त्वाचे सर्व कार्य डॉ० अ०म० घाटगे यांनी मुख्य संपादक ह्या नात्याने त्यांच्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने चालू केले.

संस्कृत कोशासारखीच दुसरी महत्त्वाची कामगिरी डॉ० कत्रे यांनी अंगावर घेतली ती भाषाशास्त्राच्या सर्वांगीण अध्ययन-अध्यापनाची सोय भारतात सर्वत्र उपलब्ध करून देणे ह्या विषयीची आहे. पूर्वी भारतात भाषाशास्त्र हा एक स्वतंत्र विषय म्हणून फक्त कलकत्ता विद्यापीठात शिकविला जात असे. पुण्यात डेक्कन कॉलेज नव्याने सुरू झाले तेव्हा तिथे इंडोयुरोपिअन फिलॉलॉजीचे एक पद निर्माण झाल्यामुळे निदान आर्यभारतीय भाषांच्या ऐतिहासिक अध्ययन-अध्यापनाची सोय तिथे झाली. परंतु तिथले काम एकांगी म्हणजे भाषांचा उद्गम व विकास ह्यासारखे नुसते ऐतिहासिक स्वरूपाचे होते, भाषाशास्त्राची जी दुसरी अंगे आहेत - वर्णनात्मक, सामाजिक, सांस्कृतिक इत्यादि, त्याविषयी तिथे काही काम होत नव्हते. दुसरी गोष्ट म्हणजे मुंबई, पुणे अशासारख्या महाराष्ट्रातील विद्यापीठांत आणि महाराष्ट्राबाहेरच्या विद्यापीठांत भाषाशास्त्र ह्या विषयाचा शुकशुकाट होता. ही स्थिती दूर करणे आवश्यक होते हे डॉ० कत्रे यांनी ओळखले आणि त्यादृष्टीने त्यांनी पावले टाकण्यास सुरुवात केली. त्यांच्या सुदैवाने त्यांना त्यांच्या परिश्रमांत उत्तम यश लाभले. ह्या कामाची सुरुवात १९५३ साली डॉ० कत्रे यांनी डेक्कन कॉलेजात भाषाशास्त्रज्ञ आणि शिक्षणतज्ज्ञ यांची एक परिषद बोलावण्यापासून झाली. ह्या परिषदेच्या वृत्तांताच्या आधारे डेक्कन कॉलेज संस्थेला अमेरिकेच्या रॉकफेलर फाऊण्डेशनकडून पाच वर्षे मुदतीचे अनुदान मिळाले. ह्या द्रव्यसाहाय्यामुळे डॉ० कत्रे १९५४-१९५९ अशी पाच वर्षे वर्षातून दोनदा पुण्यात आणि भारतातील निरनिराळ्या विद्यापीठांत उन्हाळा व हिवाळी भाषाशास्त्रीय शिबिरे भरवू शकले. ह्या शिबिरांना मोठा प्रतिसाद मिळाला. शिबिरांत भाषाशास्त्राच्या विविध अंगांचे प्रारंभिक आणि प्रगत असे

अध्यापन होऊ लागले. शिबिरांत एकदा आलेले काही विद्यार्थी पुन्हा दोन, तीन वेळा येत असत. शिबिरातल्या अध्यापनासाठी भारताबरोबरच अमेरिका आणि इंग्लंडमधील भाषाशास्त्रज्ञ येत असत. रॉकफेलर फाउन्डेशनची मदत थांबल्यावर विद्यापीठ अनुदान मंडळाने डॉ० कत्रे यांनी आरंभ केलेल्या कार्याचे महत्त्व लक्षात घेऊन हा कार्यक्रम आणखी पाच वर्षे राबवला. रॉकफेलर फाउण्डेशनतर्फे काही विद्यार्थ्यांना अमेरिकेतही भाषाशास्त्राचे उच्च अध्ययन करण्यासाठी वर्ष-दोन वर्षं राहण्याची सोय होती. (याच सोयीचा फायदा डॉ० अशोक केळकरांना मिळाला). ह्या सर्व उपक्रमांचे फलित म्हणून भारतात सर्व प्रमुख विद्यापीठांत भाषाशास्त्राच्या अध्ययन-अध्यापनाला एक स्वतंत्र विषय म्हणून स्थान मिळाले. डेक्कन कॉलेजला भाषाविज्ञानाचे प्रगत अध्ययन केंद्र ही प्रतिष्ठेची मान्यता १९६३ साली मिळाली. सिंधी स्वातंत्र्यसैनिक जयरामदास दौलतराम यांनी जेव्हा काळजी व्यक्त केली की आपल्या भाषेला भारतीय विद्याक्षेत्रात फाळणीनंतर आता कुणी वाली उरला नाही, तेव्हा कत्र्यांनी सिंधी भाषेच्या अभ्यासाला डेक्कन कॉलेजमध्ये स्थान दिले.

डॉ० कत्रे यांना ग्रंथ प्रकाशनाची मोठी आवड होती. मुद्रणकलेत त्यांना रस होता. संस्थेतर्फे होणारी प्रकाशने रेखीव असावीत इकडे त्यांचे जातीने लक्ष असे. संशोधकांच्या संशोधनाला शक्य तो लवकर प्रसिद्धी मिळणे इष्ट असते, हे ओळखून त्यांनी विविध प्रकारची प्रकाशने डेक्कन कॉलेजतर्फे सुरू केली. अगदी संस्थेचे वार्षिक नियतकालिक म्हणून 'बुलेटिन ऑफ दि डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट' सुरू झाले. (१९४०). पुढे संस्थेचे कार्यक्षेत्र वाढीस लागल्यावर, अनेक विद्यार्थ्यांनी संस्थेत काम करून पीएच्०डी०साठी प्रबंध पूर्ण केल्यावर डॉ० कत्र्यांनी १९४६ पासून 'डिझर्टेशन सिरीज' आणि 'मोनोग्राफ सिरीज' अशा दोन मालिका सुरू केल्या. १९६४साली डेक्कन कॉलेजच्या इमारतीस शंभर वर्षे पूर्ण झाली आणि योगायोगाने त्याच वर्षी जुन्या डेक्कन कॉलेजचे एक संशोधन संस्था म्हणून नूतनीकरण झाल्याला पंचवीस वर्षे, पूर्ण झाली. म्हणून १९६४ साली डॉ० कत्रे यांनी 'इमारत शताब्दी आणि रौप्य-महोत्सवमाला' ही शंभर प्रकाशने अपेक्षित असलेली नवी मालिका सुरू केली. संस्कृत कोश विभागात काम करणाऱ्या अभ्यासकांसाठी 'व्ही ए के' V a K १९५१ आणि 'सोर्सेस ऑफ इंडो-आर्यन लेक्सिकोग्राफी १९४७' अशी दोन प्रकाशने सुरू केली. दुसऱ्या प्रकाशनमालेमुळे संस्कृतचे अप्रसिद्ध कोश प्रसिद्ध होऊ शकले. डॉ० कत्रे यांनी स्वत: 'डिक्शनरी ऑफ पाणिनी' तीन भागांत प्रसिद्ध केली. (१९६८,१९६९). पुढे अमेरिकेत स्थायिक झाल्यावर डॉ० कत्र्यांनी पाणिनीच्या अष्टाध्यायीचे इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध करून (१९८७) लहान वयात सुरू केलेल्या पाणिनीच्या अध्ययनाची समाप्ती केली. ■

['भाषा आणि जीवन'च्या वर्ष १६, अंक ४, अंकात प्रसिद्ध झालेला लेख संपादित स्वरूपात.]

---

# भाषा बहरण्यासाठी जोड कर्तृत्वाची

- डॉ० सदानंद मोरे

आपल्या मराठी भाषेची मुळे शोधत जायची म्हटली, तर ती आपल्याला 'महाराष्ट्री प्राकृत' या भाषेपर्यंत गेलो तर सापडू शकतात. एके काळची आपण ज्याला 'कारभारात आणि दरबारात असलेली' भाषा म्हणू शकतो, अशी भाषा होती ही महाराष्ट्री प्राकृत! अर्थात मराठीची आद्यभाषा. या भाषेला अगदी इसवी सनापूर्वीपर्यंतचा इतिहास आहे. या एवढ्याच कारणानेसुद्धा खरेतर आपली मराठी भाषा 'अभिजात' म्हणता येईल.

इसवी सनपूर्व काळातील भारतातील एक महत्त्वाची आणि शक्तिशाली राजवट होती सातवाहनांची. याच सातवाहनांची राजभाषा म्हणजे महाराष्ट्री प्राकृत. मराठीचे आद्यरूप असणाऱ्या या भाषेला सातवाहन काळात अतिशय महत्त्वाचे स्थान आणि मानसन्मान होता.

हा सन्मान संपूर्ण भारतवर्षात होता. सर्व प्राकृत भाषांमध्ये सर्वाधिक मान असलेल्या महाराष्ट्रीय प्राकृतचा प्रभाव सार्वत्रिक होता. अगदी संस्कृत नाटकेसुद्धा प्राकृत संवादांशिवाय पुरी होत नसल्याची उदाहरणे आहेत. या काळात या भाषेने साहित्याची भाषा, नाटकाची भाषा, राज्यकारभाराची भाषा अशा सगळ्या ठिकाणची भाषा म्हणून आपली मोहोर उमटवली होती.

या ठिकाणी एक गोष्ट आवर्जून लक्षात घ्यायला हवी, ती म्हणजे त्या त्या काळात ही भाषा टिकवण्यात अनेक घटकांनी आपापला सहभाग नोंदवला आहे. जसे की सातवाहन यांच्यानंतर संस्कृत भाषेचा प्रभाव पुन्हा एकदा वाढायला सुरवात झाली होती त्या काळात जैनधर्मीयांनी महाराष्ट्रीय प्राकृत टिकवून ठेवायला मोलाचा हातभार लावला. त्यांनी ग्रंथांच्या माध्यमातून ही भाषा टिकवली. विशेष म्हणजे जैनधर्मीयांनीसुद्धा प्राकृत हीच आपल्या दैनंदिन व्यवहाराची भाषा म्हणून स्वीकारली होती. या योगदानांमुळेच ही भाषा टिकली, वृद्धिंगत होत गेली.

■

[ 'दै० सकाळ', शनिवार, दि० १६ जानेवारी २०१६ ]





अनुक्रमणिका

# तुकारामांच्या अभंगांची शैलीमीमांसा

- कलिका मेहता

सर्वप्रथम मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने आणि परीक्षक या नात्याने आजच्या पारितोषिक वितरण सोहळ्याचे मानकरी डॉ० दिलीप धोंडगे यांचे महाबँक भाषाविषयक पुरस्कार मिळाल्याबद्दल मनापासून अभिनंदन. तसेच मला पुरस्कारासाठी पुस्तकाची निवड करायची संधी दिल्याबद्दल मराठी अभ्यास परिषदेचे आभार. मी आणि दुसऱ्या परीक्षक डॉ० सुजाता महाजन, आम्ही एकूण चार पुस्तकांमधून ''तुकोबांच्या अभंगांची शैलीमीमांसा'' या डॉ० धोंडगे यांच्या पुस्तकाची निवड केली. खरेतर, शैलीविज्ञान हा माझा विषय नाही; पण हे पुस्तक वाचून पूर्ण केल्यानंतर आपण एक सुंदर प्रवास करून आलो असे मला वाटले.

शैलीविज्ञान हा अजून आपल्याकडे पूर्णत: न रुजलेला, आणि बराचसा अपरिचित विषय आहे. मराठीत या विषयावर उपयोजनात्मक असे अत्यंत मोजके लेखन झाले आहे. त्यातून तुकारामांचे अभंग हे आधीच्या काळातले, अर्थाचे आणि रचनेचे सूक्ष्मातिसूक्ष्म बारकावे असणारे, लेखकाच्या शब्दांत सांगायचे तर अक्षराअक्षरात आत्मा अवतरल्याची प्रचिती देणारे. शिवाय अभंग-लेखनाचा कालानुक्रम, त्या काळातल्या व्यावहारिक स्तरावरच्या भाषेचे लिखित नमुनेही उपलब्ध नाहीत. अशा सतराव्या शतकातल्या साहित्यकृतीची, विसाव्या शतकात विकसित झालेल्या शैलीविज्ञानाच्या तत्त्वांशी कल्पनेपलीकडची सांगड घालून लेखकाने हे संशोधनपूर्ण पुस्तक लिहिले आहे, हेच ह्या पुस्तकाचे बलस्थान आहे. या पुस्तकामुळे मराठीच्या ग्रंथविश्वात अत्यंत मोलाची भर पडलेली आहे आणि हे पुस्तकही स्थळकाळनिरपेक्ष झाले आहे.

या पुस्तकात एकूण नऊ प्रकरणे आहेत. 'शैलीविचार : एक परिदर्शन' या पहिल्या प्रकरणात लेखकाने शैलीविज्ञानाची आधुनिक संकल्पना स्पष्ट केली आहे. पूर्वी शैली म्हणजे साहित्यकृतीचे अलंकरण अशी समजूत होती. डॉ० रमेश धोंगडे यांनी आपल्या 'मराठी भाषा आणि शैली' या पुस्तकात शैलीविज्ञानाबद्दलचा भाषावैज्ञानिक दृष्टिकोन मांडला आहे. त्यांच्या मते शैलीवैज्ञानिक चिकित्सा ही पारंपरिक समीक्षेपेक्षा वेगळी, जास्त वस्तुनिष्ठ आणि अधिक शिस्तबद्ध असते. पारंपरिक समीक्षेवरचा संस्कृत काव्यशास्त्राचा प्रभाव ठळकपणे जाणवतो. आधुनिक शैलीविज्ञानाला मात्र साहित्यत्व आणि भाषा यांच्यामधला, म्हणजेच आशय आणि अभिव्यक्तीमधला किंवा विचार





अनुक्रमणिका

आणि शैलीमधला पारंपरिक भेद मान्य नाही. पाश्चात्त्य शैलीविज्ञान हे वाङ्मय-समीक्षेतील भाषाविज्ञानाच्या उपयोजनाचे फळ आहे. शैलीविज्ञानाबाबत आणखी एक रूढ झालेली समजूत म्हणजे शैलीविज्ञान हा भाषाविज्ञानाचा एक पोटविषय आहे. भाषेची आंतरिक क्षमतेची संरचना किंवा प्रत्यक्ष भाषाव्यवहारातील संरचना हे भाषाविज्ञानाचे प्रमुख उद्दिष्ट असते. भाषा म्हणजे रूप आणि अर्थ यांना जोडणारी संरचना. साहित्यकृती हा भाषिक व्यवहार म्हणून साहित्यकृतीच्या आविष्काररूपांचा विचार म्हणजे शैलीविज्ञान. हा विचार प्रामुख्याने समांतरन्यास (पॅरलेलिझम), सममूल्यता (इक्विव्हॅलन्स) आणि प्रमाणकांपासून विचलन (डेव्हिएशन फ्रॉम नॉर्म) या तत्त्वांच्या आधारे होतो.

ह्याविषयी डॉ० दिलीप धोंडग्यांनी सुद्धा अत्यंत स्पष्टपणे कबूल केले आहे की शैलीविचार आणि भाषाविज्ञान यांच्या परस्परसंबंधाविषयी एकूणच गोंधळाची परिस्थिती आहे. समीक्षा-व्यवहारातील भाषाविज्ञानाच्या कार्याविषयी त्यांनी अत्यंत नेमके विवेचन केले आहे. भाषाविज्ञान हे साहित्यकृतीतील अंत:स्फूर्तीने जाणवलेल्या घटकांचे व्यवस्थाबद्ध भाषाविश्लेषण करून मूल्यमापनासाठी पाया तयार करते. शैलीविज्ञानातही साहित्यकृती हीच केंद्रस्थानी असते; पण त्यात केवळ भाषाविज्ञानासारखी भाषिक कारणमीमांसा नसते. साहित्यकृतीतल्या सौंदर्यानुभवांचे विश्लेषण नसते. तिच्याकडे कलाकृती म्हणून पाहिले जाते; पण तसे करताना फक्त आशयावर भर दिला जात नाही. तसे केले तर तिच्यातली कला दुय्यम ठरते. रोमान याकोबसन यांनी म्हटल्याप्रमाणे साहित्यकृतीतल्या भाषेचे काव्यात्म कार्य आणि भाषावैज्ञानिक विश्लेषण या दोन्ही गोष्टींची सांगड शैलीविज्ञानात घातली जाते. त्यामुळे शैलीविज्ञान हे साहित्यकृतीतल्या सुंदर कलानुभवाची पुन्हा प्रचिती देऊ शकते. हे पुस्तक वाचताना नेमका हाच पुन:प्रत्यय येतो. आणि तसा तो आणून देण्यात लेखकाचा खरा माल कसोटीला उतरला आहे.

दुसऱ्या प्रकरणात लेखकाने वारकरी शैलीच्या संदर्भात तुकारामांच्या अभंगांचा विचार केला आहे. ज्याप्रमाणे वाङ्मयेतिहासात वाङ्मयीन परंपरांचा शोध घेण्यासाठी युग ही संकल्पना मानली जाते, त्याप्रमाणे शैलीविज्ञानात भाषेचा एककालिक व द्वैकालिक अभ्यास करून भाषेचे स्वरूप निश्चित करण्यासाठी युग ही भाषाविज्ञानाधिष्ठित संकल्पना वापरली जाते. एखाद्या विशिष्ट काळातील भाषेचे सर्वसाधारण स्वरूप म्हणजे त्या युगाची शैली. बाराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंतच्या युगशैलीला त्यांनी वारकरी शैली म्हटले आहे. त्यांच्या मते वारकरी हा केवळ एक संप्रदाय नसून ती आचार-विचारांची एक संकल्पना आहे. वारकरी संप्रदायाच्या देवळाचा त्यांनी सखोल अभ्यास केला आहे, कानाकोपरा न्याहाळला आहे. इथल्या देवतांचे आणि दैवतांचे अनेकांगांनी श्रद्धेने पण तटस्थपणे निरीक्षण केले आहे आणि ते आपल्यासमोर मांडून कळसाच्या दर्शनाचे पुण्य आपल्या पदरात टाकले आहे.

लेखकाने घातलेली आणखी एक नाविन्यपूर्ण भर म्हणजे वारकरी संप्रदायातला चिद्विलासवाद शैलीविज्ञानाला जोडून दाखवला आहे. वारकरी ब्रह्म सत्य तर मानतातच; पण जगाला मिथ्या न मानता ब्रह्माचा विलास मानतात. तोही तितकाच खरा मानतात. त्याचप्रमाणे शैलीविज्ञानात आशय तर सत्य म्हणजे महत्त्वाचा आहेच; पण त्या आशयाला मूर्त रूप देणारा कलेचा पसाराही तितकाच महत्त्वाचा आहे. कलाकृतीचे रूपही मिथ्या म्हणजे गौण नाही. हा शैलीविज्ञानातला चिद्विलासवाद.

पुढच्या रूप व नादमयता, वाक्यस्तरीय काव्यात्मकता, प्रतिमांचा अभ्यास, कथांची कथनमीमांसा इतकेच नव्हे; तर अवतरणक्षमता आणि पारिभाषिक संज्ञा- भावार्थविचार या सर्व प्रकरणांमधून लेखकाचा प्रचंड अभ्यास जाणवतो. या प्रत्येक टप्प्यावर अभंगांची त्यांनी शैलीलक्ष्यी पद्धतीने उकल केली आहे. ही पद्धत युरोपात विकसित झाली; पण तिच्यात आपल्या भारतीय साहित्यशास्त्रातली काही तत्त्वे आहेतच. लेखकाने त्या तत्त्वांचेही अत्यंत चपखल उपयोजन केलेले आहे.

अभंग या रचनेचा ऐतिहासिक अंगाने आणि रचनाबंध म्हणून विचार करताना लेखकाने त्याची ओवीशीही तुलना केली आहे. ओवी आणि अभंग हे दोन्ही लौकिक रचनाबंध असून त्यांचे कूळ आणि मूळ एकच आहे. लेखकाने त्या दोन्हींच्या व्युत्पत्तींची चर्चा केली आहे. तसेच अभंग या रचनाप्रकाराचा आढावा घेतल्यानंतर तुकोबांच्या अभंगांची शैलीगत वैशिष्ट्ये शोधली आहेत. त्यांच्या अभंगांतील रचनाबंधांचा नादमयतेच्या दृष्टीने विचार करताना त्यांनी नमुना-पाहणीसाठी काही अभंग निवडले आहेत व आघातावर्तन, वाक्यावर्तन, यमक, प्रास असा सर्वप्रकारे त्यांचा विचार केला आहे. अभंगांचे मूळ स्वरूप मौखिक असल्यामुळे सामूहिक पठन, गायन आणि त्याचा रचनाबंध यांचा काही परस्परसंबंध आहे का यावरही त्यांनी प्रकाश टाकला आहे. त्याची नादमयता उलगडून सांगताना, टाळी वाजवून किंवा ठेका धरून या रचना म्हणायचा प्रयत्न केला तर आघाताच्या जागा कशा निश्चित करता येतात; विशिष्ट अवयवावर येणारा आघात अर्थाच्या अभिव्यक्तीला कसा मदतरूप होतो; आणि सुख-श्रीमुख, उष्टावळी-पत्रावळी, जवापाडे-पर्वताएवढे, भेटी-तुटी, रांधा-बाधा, मासा-घसा, भारी-शिरी, सोहळा-डोळा, चित्त-वित्त, मानव-दानव अशा प्रकारची यमके वाक्य आणि अर्थ या दृष्टीनेही कशी महत्त्वाची आहेत हे उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे. ''भंगलिया चित्ता नये कशाने सांधिता'' या ओळीत भंगणे व सांधणे या मूर्त वस्तूच्या बाबतीत घडणाऱ्या क्रिया 'चित्त' या अमूर्त गोष्टीबाबत कल्पून जे रूपक साध्य झाले आहे ते चित्ता आणि संहिता या यमकाला अर्थपूर्ण बनवते हे त्यांनी सुरेख विश्लेषण करून सांगितले आहे.

''डोई वाढवूनि केश। भूते आणिती अंगास ।।

तरी ते नव्हती संतजन। तिथे नाही आत्मखुण।।''

या अभंगात ज्या अवयवांवर आघात पडतात ते अवयव अर्थअभिव्यक्तीसाठी उपयोगी ठरतात. ''सुख पाहता जवापाडें । दु:ख पर्वताएवढें।।'' यात शेवटी साधलेल्या यमकामुळे त्यांच्यातले आणि अनुषंगाने सुख आणि दु:ख यांच्यातले परस्परविरोधी नाते अधोरेखित होते. २० अभंगांची त्यांनी या प्रकारे फोड करून दाखवली आहे. यमकांचे कार्य नादान्वय, चरणान्वय व अर्थान्वय ह्या तिन्ही पातळ्यांवर महत्त्वाचे असते. तुकोबांच्या अभंगांमधली यमके अत्यंत नादपूर्ण तर आहेतच; पण अर्थपूर्णही आहेत.

यमक हा घटक किती महत्त्वाचा असतो याचे उत्तम उदाहरण म्हणजे ''नाही हाती दान । शूरपणाचे कांकण।।'' हा अभंग. इथे दानशूरपणा हा सामासिक शब्द विभागून दान आणि कांकण असे यमक साधले आहे आणि दानाचे आणि शूरपणाचे कांकण हातात नाही असा दुहेरी अर्थ सूचित केला आहे.

पद्यरचनेचा पुनरावर्तन हा पाया असतो. पुनरावर्तन म्हणजे एखादा व्याकरणिक घटक प्रत्येक चरणात पुन्हापुन्हा येतो. त्यामुळे तळमळ, उत्कटता, आर्तता इ० भावनांची प्रचिती येते.

चित्ती नाही तें जवळी असोनि काय । वत्स सांडी माय तेणें न्याये ।<br>
तुका म्हणे अवघे फिके भावाविण । मीठ नाही अन्न तेणें न्याये ।

हे वाक्यपातळीवरील समांतरन्यासाचे उदाहरण आहे. इथे उत्तरार्धातील चरणांमध्ये आवर्तन आहे. उत्तरार्धातील दोन्ही वाक्ये प्रधान आणि पूर्वार्धातील दोन्ही वाक्ये गौण आहेत. दोन्ही वाक्यांमध्ये व्यवहारातील उदाहरणे आहेत. काय-माय, भावाविण-अन्न ही यमके आणि तेणें न्याये ह्या पूरकाचे आवर्तन; शिवाय बिनमिठाचे अन्न आणि भक्तिभावाशिवायचे अळणी जीवन दोन्ही स्वाद ह्या संवेदनेशी जोडल्यामुळे त्यातून चांगला अर्थपरिपोष झाला आहे. ''पराविया नारी माउलीसमान'' या अभंगात ''काय तुमचें यास वेचे सांगा'' या प्रश्नाचे आवर्तन आहे. अशाप्रकारच्या पुनरावर्तनामुळे संवाद साधण्याची तळमळ, उत्कटता, आर्तता, उत्स्फूर्तता, जगदुद्धाराची कळकळ इ० भावना व्यक्त होतात. लेखकाने अशी उदाहरणे देऊन लोकसाहित्यातील काव्यबंध आणि संतसाहित्यातील रचनाबंध यांतील नाते शोधण्याचा प्रयत्न केला आहे.

दामयमक म्हणजे पहिल्या चरणाच्या शेवटचा शब्द दुसऱ्या चरणाच्या सुरुवातीला येतो. उदा० ''माया ते चि ब्रम्ह । ब्रम्ह ते चि माया।। भक्त तो चि देव । देव तो चि भक्त ।।'' इ० छोट्या पण महत्त्वाच्या गोष्टींकडे लेखकाने वाचकांचे लक्ष वेधले आहे आणि अभंग ही कानांनी ऐकायची कविता असते हे पटवून दिले आहे.

वाक्यस्तरीय काव्यात्मकता हे चौथे प्रकरण तर अगदी अजोड आहे. वाक्य

आणि महावाक्य ही पौर्वात्य संकल्पना (टेक्स्ट) आणि (डिस्कोर्स) या पाश्चात्त्य संकल्पनेशी मिळतीजुळती आहे हे दाखवताना त्यांनी ''साहोनिया टांकीघाये पाषाण देव चि जाला पाहे'' या अभंगाचे उदाहरण घेतले आहे. संपूर्ण अभंग म्हणजे एक महावाक्य आणि त्यातली प्रत्येक ओळ म्हणजे काव्यात्म वाक्य किंवा (टेक्स्ट). साधकाने मोक्षरूपी कार्य साधण्यासाठी मन दृढ केले पाहिजे हे उपमेय. ते स्पष्ट करण्यासाठी टाकीचे घाव सोसणारा दगड, शस्त्र, बाण व गोळी सोसणारा शूर व अग्नीत समर्पण करणारी सती ही उपमाने. प्रत्येक ओळीतल्या उपमानातून रूपक विकसित होत होत संपूर्ण महावाक्याचा (डिस्कोर्सचा) एकात्म अर्थबोध व्यक्त होतो. ही सर्व उपमाने एकाच प्रकारची आहेत; कारण सर्वांमधून सहनशीलतेचा भाव स्पष्ट होतो. यावरचे पुस्तकातले विवेचन मुळातून वाचले पाहिजे इतके ते अप्रतिम आहे.

महावाक्याचा संरचनेला क्रमबद्धतेमुळे अर्थपातळ्या लाभतात. महावाक्य समजणे म्हणजे एका अर्थपातळीकडून दुसऱ्या अर्थपातळीकडे जाणे. असे जाताना वाचन ही यांत्रिक प्रक्रिया न राहता वाचकाच्या बाजूने नवसर्जन बनते. इतक्या सरळ आणि सोप्या भाषेत सांगितल्यावर शैलीविज्ञान का नाही समजणार?

लेखकाने तुकोबांच्या अभंगांतल्या काव्यात्म वाक्यांची वैशिष्ट्ये उलगडून सांगताना सविस्तर चर्चा केली आहे. काही अभंगांमध्ये एकच रूपघटक पण वेगळ्या व्याकरणिक वर्गाचा प्रतिनिधी म्हणून येतो. उदा० ''हरी हरी दोष सकळ'' इथे एक हरी हे नाम आणि दुसरे क्रियापद आहे. किंवा ''तुका म्हणे काळें काळे केले तोंड'' हे उदाहरण - काळाने तोंड काळे केले असा अर्थ होतो. हा भाषिक समांतरन्यास. काही ठिकाणी तुकोबांनी 'आकळले', 'खोडावले', 'अंतरे', 'आतळणे', 'डौरणे'सारखे नामापासून बनलेले धातू वापरले आहेत; तर काही ठिकाणी 'तेज्या', 'लोभ्या', 'ज्वरल्या', 'सोवित्या'सारखी क्रियानामे वापरली आहेत. 'तेज्या' म्हणजे 'तेज धावणारा', 'लोभ्या'=लोभ धरणारा, 'ज्वरल्या'=ताप आलेला, 'सेवित्या' = सेवणारा. अनेक अभंगांमध्ये 'घसघस', 'केरपुंजे', 'ढाळ', 'पादरधीट', 'हागणदरी', 'टाचर' अशी बोलीभाषेतील रूपे आहेत. काही ठिकाणी सामासिक शब्द विभागले आहेत. उदा०'लाजिर हे वाणे' किंवा 'नाही हात दान शूरपणाचे कांकण', 'तुका म्हणे महि । पत्र सिधूं न पुरेशाई।'. बेशरम, वजन, इमान, मुलामा, हिशोब, जाब, फजितखोर इ० अरबी फारसी शब्दांचा वापरही बऱ्याच ठिकाणी केलेला आढळतो. काही ठिकाणी क्रियापदांची पुनरावृत्ती आहे. जसे ''पीक नव्हे नव्हे जाण'', ''आता दाखवा दाखवा। मज पाऊले केशवा।'', ''नको नको मना गुंतू मायाजाळी।।'', ''पुरे पुरे आता'' ह्या पुनरावृत्तीतून अधीरता, ठामपणा, निषेध इ० भाववैशिष्ट्ये वाचकांपर्यंत पोचतात. कधी हीच उत्कटता एकाच पदाचे दुसरे समानार्थी पद वापरूनही व्यक्त झाली आहे. उदा० ''लागतचि धन नाही वित्त, जाणावे ते प्रेत शव लोकी''

किंवा ''निंदा हे भोजन जेवण तयांसी ।''

लेखकाने काव्यात्म वाक्याचे आज्ञार्थी, विध्यर्थी, प्रश्नार्थी, संबोधनार्थी असे वर्गीकरणही बारकाईने केले आहे. उदा० ''कोण त्यांची गती होईल नेणों।। तरी तू पावन कैंचा येथ।।'' अशी प्रश्नार्थी वाक्ये, ''हो का पुत्र पत्नी बंधू । त्यांचा तोडावा संबंधू ।।, होत बाप माय वर्जावी ती ।।'' अशी विध्यर्थी वाक्ये, ''तुका म्हणे सोस। दु:ख आता पुढे नास ।।'', ''तुका म्हणे चला । पुढती सामोरे विठ्ठला।।'' अशी आज्ञार्थी वाक्ये, ''म्हणती गोपाळ बेटे हो देव'' अशी संबोधनार्थी वाक्ये.

तुकोबांच्या अभंगांचे आणखी एक वैशिष्ट्य लेखकाने इथे लक्षात आणून दिले आहे. चरणातल्या एखाद्या अपेक्षित घटकाचा लोप केलेला असतो म्हणजे 'आनंदाचे डोही' ह्या अभंगांत 'आहे' या सहाय्यकारी क्रियापदाचा लोप झाला आहे. त्यामुळे इतर पदे वाचकांचे लक्ष वेधून घेतात, त्यात क्रियापद नाही हे जाणवतही नाही.

तुकोबांचे अभंग आपण जीवनाच्या प्रत्येक टप्पावर ऐकलेले, वाचलेले असतात. पण पुस्तकात ह्या छोट्या-छोट्या गोष्टी लक्षात आणून दिल्यामुळे ते इतके अर्थवाही, लवचीक आहेत हे नव्याने समजते. त्यांच्या काव्यात्म वाक्यांची सुरुवात बहुतेकवेळा क्रियापदांनीच होते. ''ढेकणासी बाज गड।। उतर चढ केवढी-'' यातला चित्रदर्शीपणा पुस्तक वाचल्यावरच लक्षात येतो. बाजेवर चढणारा ढेकून चक्क डोळ्यांसमोर दिसायला लागतो!

वस्तू, प्राणी, व्यवहार यांनी समृद्ध झालेली तुकोबांची प्रतिमासृष्टीही विचार व भावना ह्यांची खोली वाढवते. ''कन्या सासुरासि जाये'' हा अभंग आपण कैकदा वाचलेला आहे. पण कन्या, मासोळी ह्या दृक्प्रतिमा तुकोबांच्या तळमळणाऱ्या भावावस्थेच्या प्रतिमाकेंद्राशी औपम्यमूलक संबंधांनी बांधल्या गेलेल्या आहेत हे डॉ० धोंडग्यांनी फार रसाळपणे विषद केले आहे.

झाडावर दोन व्यालेले पक्षी, शिकारी, ससाणा आणि पक्ष्यांनी केलेला आर्त धावा ऐकून सापाच्या रूपात प्रकटलेला परमेश्वर ह्या गोष्टीतून तुकोबांची कथनगुणपरता, त्यांचातला निवेदक आणि गर्भित लेखक कसा दिसतो याचेसुद्धा लेखकाने अत्यंत परिणामकारक पद्धतीने विश्लेषण केले आहे. इतकेच नव्हे तर तुकोबांच्या अभंगांतली उत्स्फूर्त वाटणारी अवतरणेही कशी प्रबोधन करून जातात, ती कशी श्लेष, रूपक, उपमा, अर्थांतरन्यास इ० अलंकारांनी नटलेली आहेत याचाही विस्तृत आढावा ह्या पुस्तकात घेतलेला आहे. डॉक्टर धोंडगे म्हणतात त्याप्रमाणे तुकोबांचे अभंग मंत्रशक्तीने भारलेले आहेत. वाऱ्याहाती माप देशोदेशी गेलेले असल्यामुळे लहान-मोठे, सुशिक्षित-अशिक्षित, भक्त-व्यावसायिक सर्व जण आपापल्या बुद्धीकुवतीनुसार पण आत्मविश्वासाने अभंगांमधली अवतरणे वापरतात. असे असले तरी हे अभंग एक अखंड महावाक्य





अनुक्रमणिका

आहे ही अनुभूती वाचकांना आणून देण्याचे अत्यंत अवघड काम या पुस्तकाने केलेले आहे. शेवटच्या प्रकरणात वारकरी संप्रदायाच्या पारिभाषिक संज्ञांचे स्पष्टीकरण आहे. तेही साध्या, सुगम भाषेत, कुठेही क्लिष्ट न होऊ देता.

प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे पाश्चात्त्य शैलीमीमांसेतून उपलब्ध झालेल्या उपकरणांचा (डिव्हाइसेस) उपयोग करून तुकोबांच्या कवितेचे वेगळेपण आणि महत्त्व लेखकाने ह्या पुस्तकातून आपल्यासमोर ठेवलेले आहे. हे करत असताना शैलीविज्ञानाची परिभाषा ही घडत गेली आहे. मराठी ज्ञानभाषा होण्याच्या दिशेने वाटचाल सुरू आहे हेच यातून स्पष्ट होते. डॉ० धोंडगे स्वत: म्हणतात तसे ते ह्या पुस्तकाची निर्मिती करत असताना तुकोबांच्या साहित्यविश्वात मनसोक्त खेळले, बागडले, त्याचा आनंदही पुरेपूर घेतला आणि महत्त्वाची गोष्ट म्हणजे तुकोबांना जे म्हणायचे होते ते शैलीविज्ञानाची तत्त्वे वापरून आपल्यापर्यंत नेमके पोचवले. आपल्यालाही त्या आनंदखेळातला एक गडी करून घेतले.

आपणा सर्वांच्या वतीने मी डॉ० धोंडग्यांना विनम्रपणे सांगते की अशी आनंदरसात डुंबायला लावणारी सारस्वताची अनेक गोड, अजरामर झाडे अशा प्रकारच्या मीमांसेची वाट पाहत आहेत. तुमच्या हातून अशी साहित्यसेवा यापुढेही घडत राहो आणि आम्हाला उत्तमोत्तम कलाकृती वाचायला मिळोत हीच शुभेच्छा. पुन्हा एकदा तुमचे मनापासून अभिनंदन.

■

चलभाष - 9881250083

[ पारितोषिक वितरणाचा कार्यक्रम पुणे येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सभागृहात १८ मार्च २०१७ रोजी पार पडला. ]

## चक्रधरस्वामींचा खटला मराठीतून!

न्यायालयीन भाषा म्हणूनही मराठीने आपले सशक्त अस्तित्व खूप आधीच दाखवून दिले आहे. एके काळी चक्रधरस्वामींवर दाखल झालेला एक खटला हादेखील पूर्णपणे मराठीतूनच चालवला गेला होता. लीळाचरित्रात याचा उल्लेख सापडतो. या खटल्यातील आरोप, त्याची सुनावणी, त्यातील वादी-प्रतिवादी यांचे दावे, निवाडा, त्या संदर्भात मांडली गेलेली मते हे सारेच मराठी भाषेतून केले गेले होते.

- डॉ० सदानंद मोरे, 'सकाळ', शनिवार, दि० १६ जानेवारी २०१६





अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील तुकाराम व जर्मनीतील आन्गेलस सिलेसिउस यांच्या सांस्कृतिक काव्यशास्त्रातील मनुष्यत्व[१]

- गिरिषा टिळक

मनुष्यत्व... ही संकल्पना ज्या प्रकारे रूढ झालेली आहे तिच्यानुसार तिचा अर्थ व्यक्तिगणिक असणारी उद्दिष्टे, असा होऊ शकतो. मनुष्यत्व ही एक प्रक्रिया आहे. बाल्यावस्थेपासून या प्रक्रियेचा प्रवास सुरू होतो आणि प्रौढावस्थेपर्यंतच्या स्थित्यंतरातून तो पुढे सरकतो. प्रत्येक व्यक्ती जीवनाच्या विविध टप्प्यांवर विकसित होत असते. या उत्क्रांतीअवस्थेत ती, आपल्या जगण्यासाठी लागणाऱ्या मूलभूत गरजांच्या पूर्ततेसाठी सतत झगडत असते. ही अशी प्रक्रिया आहे जिचा सातत्यपूर्ण पाठपुरावा अपेक्षित असतो.

'पुरुष' हा संस्कृत शब्द मनुष्यत्वाच्या अर्थाशी साधर्म्य दर्शवतो. माणूस हा सामाजिक प्राणी आहे. 'सामाजिक प्राणी' या संज्ञेमध्ये प्राणी या शब्दाचे 'सामाजिक' हे विशेषण आहे. याचे अजून सूक्ष्म निरीक्षण केले तर विशेषण हे नामाच्या पुढे किंवा पाठीमागे जोडले जाते. म्हणजेच नाम ही सहजप्रवृत्त बाब आहे; पण विशेषणे ही मात्र कार्यप्रवण बाब आहे. बाल्यावस्थेपासून प्रौढावस्थेतील उद्दिष्टांपर्यंत नेणारी स्वप्रक्रिया म्हणजे 'मनुष्यत्व'. ही जाणीवपूर्वक केलेली उदात्त प्रक्रिया आहे. या प्रक्रियेत प्रत्येक व्यक्तीला तिने तिच्या जीवनात काय करावे आणि काय करू नये ते उमजते. ए०सी० परांजपे यांच्या "सेल्फ अँड आयडेन्टिटी इन मॉडर्न सायकॉलॉजी अँड इंडियन थॉट" या पुस्तकात त्यांनी म्हटले आहे, "पाश्चिमात्य देशात सामाजिक, राजकीय वर्तुळात व्यक्तिगत हक्कांना महत्त्व दिले जाते. भारतीय परंपरेमध्ये व्यक्तीच्या कर्तव्यांना आणि नैतिक तसेच आध्यात्मिक कार्यक्षेत्रातील तिच्या दर्जाला महत्त्व दिले जाते."[२] (परांजपे, १९९८ : ६१) प्रत्येक व्यक्तीला माणूस म्हणून घडविण्यात शिक्षणाचा मोठा वाटा असतो. संस्कार, ज्ञान आणि औपचारिक शिक्षण यांतून व्यक्ती घडत जाते.

---

१ पर्सनहुड (Personhood) या शब्दाचे भाषांतर मनुष्यत्व असे केले आहे.

२ "In the West the emphasis is generally on the individual rights in sociopolitical sphere; in the Indian tradition the emphasis is on the individual's obligations and status in the ethical and spiritual domain."

मनुष्यत्वाच्या प्रक्रियेत ती स्वत: वेगळी राहत नाही. तिला समाजाची गरज असते. शैक्षणिक गुणवत्तेमुळे व्यक्ती माणूस बनते आणि जेव्हा समाज या प्रक्रियेत समाविष्ट होतो तेव्हा माणूस हा समाजाचा घटक बनतो. या संपूर्ण प्रक्रियेत सातत्य असावे लागते. जॉन लॉक म्हणतात, ''युरोपीय प्रबोधनकाळातील विचारवंतांच्या मते, व्यक्तीमधला समजूतदारपणा, भावना, स्वतंत्र इच्छाशक्ती आणि त्याचबरोबर जाणीव, ममता व कार्यात्मक हेतू या मनुष्यत्वाकरिता लागणाऱ्या आवश्यक बाजू आहेत.'' (परांजपे, १९९८ : ६६) साध्या सोप्या शब्दात सांगायचे तर मनुष्यत्व हे विशेषण आहे, हा प्रयत्न आहे, ही सातत्य असलेली प्रक्रिया आहे, ज्या प्रक्रियेला उद्दिष्टाची जोड लागते.

बाल्यावस्थेपासून प्रौढावस्थेपर्यंत झालेला शारीरिक बदल जेव्हा व्यक्तिनिहाय उद्दिष्टांसाठी घडत जातो तेव्हा त्याला मनुष्यत्व म्हणतात. प्रौढावस्थेकडे झुकत जाणे ही मानवी शरीराची नैसर्गिक प्रक्रिया आहे. मानवाची बाल्यावस्थेकडून प्रौढावस्थेकडे वाटचाल होत असताना जेव्हा ही वाटचाल उद्दिष्टे, कारणे यांना अनुलक्षून होते, तेव्हा किंवा त्यानंतरच मानवाचे मनुष्यत्व दृग्गोचर होते. जेव्हा कलाकार, कवी, लेखकमंडळी मनुष्यत्वाबद्दल बोलतात तेव्हा त्यांच्या कलाकृतीत सर्जनशील मनुष्यतत्त्वाची मूल्ये असतात आणि जेव्हा द्रष्टा पुरुष मनुष्यतत्त्वाबद्दल बोलतो तेव्हा त्यात उदात्त मूल्ये असतात. महाराष्ट्रातील द्रष्टे पुरुष संत तुकाराम आणि प्राचीन जर्मनीतील ब्रेस्लाऊ (पोलंडमधील व्रोक्लो) येथील द्रष्टे पुरुष आन्गेलस सिलेसिउस यांनी सतराव्या शतकातील त्यांच्या काव्यात सामाजिक, राजकीय परिस्थिती आणि साहित्य यांतील दुवा निखालस जोडला आहे. दोघेही द्रष्टे पुरुष असले तरी सामाजिक परिस्थिती आणि साहित्य या दोन्ही बाबींबाबत त्यांचे घट्ट नाते दिसते. ते आजही प्रसंगोचित व पूरक ठरते. अभिजात साहित्य कोणत्याही कालखंडात ऊर्जा पुरविते. या योग्यतेमुळेच दोनही द्रष्ट्या पुरुषांनी लिहिलेल्या, दोन भिन्न सांस्कृतिक संबंधांतील सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय, ऐतिहासिक पार्श्वभूमीवरील साहित्याचे भाषांतर, अभिरुचीसंपन्न, माहितीसंपन्न असतेच; पण या साहित्यातील सांस्कृतिक जीवनाचा व्यापक अन्वयार्थ, त्यातील गहनता शोधणेही महत्त्वाचे ठरते. जर्मन द्रष्टे कवी आन्गेलस सिलेसिउस आणि मराठी द्रष्टे कवी तुकाराम यांनी धार्मिक आणि आध्यात्मिक श्रद्धेवर आधारलेली कविता लिहिली. परंतु धार्मिक याचा अर्थ तात्त्विक, कर्मकांडीक न मानता, मानवता-धर्म, जीवनावरील निष्ठा, सामाजिक श्रद्धा असा होता.

भारतात तुकारामांना संत म्हणून मान्यता मिळाली. देवाशी तादात्म्य पावावे, देवाशी एकरूप व्हावे, असे तुकारामांना मनोमन वाटत असे. त्यांना जटील प्रचलित रूढी मान्य नव्हत्या. त्यांवरील त्यांनी केलेल्या टीकात्मक भाष्याचा त्यांच्या जीवनावर

आणि त्यांनी अंगिकारलेल्या कामावरही परिणाम झाला. त्यांनी अभंग गाऊन समाजप्रबोधन केले. भक्ती-संप्रदायातून भक्तिमार्गाने समाजप्रबोधन होत असताना तुकारामांनी त्यांच्या अभंगांतून द्रष्टेपणा व्यक्त केला; त्यामुळे त्यांचे अभंग द्रष्टेपणाच्या परंपरेत समाविष्ट होतात. त्यांच्या द्रष्टेपणात वास्तवाला झुगारून देण्याची वृत्ती दिसत नाही. उलट जीवनातला संघर्ष स्वीकारून, प्रसंगी टोकदार टीकात्मक बोली, पारमार्थिक तळमळ, पूर्वाश्रमी केलेल्या चुकांची स्वीकृतीही दिसून येते. तुकारामांचे दैनंदिन आयुष्यातील व्यवहारज्ञान त्यांच्या द्रष्टेपणामुळे यत्किंचितही संकुचित झाले नव्हते. किंबहुना त्या दोनही बाबी परस्परपूरकच ठरल्या होत्या.

याच शतकात आन्गेलस सिलेसिउसची सुभाषिते आणि लघुकविता (एपिग्राम) असलेला 'देर शेरुबिनीश वान्डरर्मान' (द शेरुबिनीक वॉन्डरर्) संग्रह लोकांसमोर आला. जीझसच्या जखमा म्हणजे गुलाबाची फुले, त्यातील रक्त म्हणजे मधमाशीला वाटणारा मध. मधमाशी आणि मध या नैसर्गिक घटकांना डोळ्यासमोर ठेवून परमोच्च करुणरसात भिजलेले हे रूपक. या रूपकाने नैसर्गिक घटकांवर मात करून रूपकाची संवेदना अधिक गहिरी केली आहे. रूपकाची संवेदना सूचित करणे हे रूपकात्मक काव्याचे वैशिष्ट्य असते. वरील रूपकही भक्तीची उदात्त पातळी गाठते. सिलेसिउसच्या कवितेत भक्तीचा उत्कट करुणरस दिसून येतो. त्याच्या रचना गहन असल्या तरी समर्थ होत्या. भावनोत्कट कल्पबंध सिलेसिउसच्या कवितांचा प्राण समजला जातो. त्यांच्या कविता म्हणजे समर्थ भावनिक जागृती होती.

मनुष्यत्वासंबंधी तुकाराम आणि आन्गेलस सिलेसिउस आपल्या कवितांत म्हणतात :

तुकाराम :
जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ।।१।।
तोचि साधु वोळखावा । देव तेथेंचि जाणावा ।।२।।
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनांचें चित्त ।।३।।
ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ।।४।।
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ।।५।।
तुका म्हणे सांगू किती । त्याचि भगवंताच्या मूर्ती ।।६।।
(तुकारामाची गाथा, अभंग २०१)

म्हणजेच,
जे प्रापंचिक त्रासाने दु:खी झालेले आहेत पिडलेले आहेत त्या सर्वांना जो आपले मानतो ।।१।। तोच साधू म्हणून ओळखावा, त्याच्या ठिकाणी देव असतो असे समजावे ।।२।। सज्जन माणसाचे मन आतून व बाहेरून लोण्याप्रमाणे मृदू असते.(तो दयाळू

असतो) ।।३।। ज्यांना कोणाचाही आधार नाही अशा निराधारांना तो आपले मानून आधार देतो ।।४।। तो आपल्या मुलाप्रमाणे नोकरांवर दया करतो ।।५।। तुका म्हणतात असे सज्जन हेच देव असतात ।।६।।

आन्गेलस सिलेसिउस :
Die Menschtheit soll man lieben
Daβ du nicht Menschen liebst, das tust du recht und wohl
Die Menschheit ist's, die man im Menschen lieben soll
(देर शेरुबिनीश वान्डर्स्मान, पहिले पुस्तक, १६३)

म्हणजेच,
मानवजातीवर प्रेम करावे, माणसावर नाही.
एकेका माणसावर तू प्रेम करत नाहीस, हे बरोबर आहे, चांगलं आहे.
माणसाने माणसावर प्रेम करण्यापेक्षा माणसातल्या मनुष्यत्वावर प्रेम करावे.

तुकाराम आणि आन्गेलस सिलेसिउस यांची मनुष्यत्व, देवत्व, मानवजात, माणुसकी यांवरची मते वरील ओळींतून दिसून येतात. तुकाराम सांगतात, देव माणसातच आहे; त्याला इतरत्र शोधण्याची गरज नाही. प्रत्येकाने स्वत:त डोकावून बघावे. तुकारामांच्या डोळ्यांना भगवंताची मूर्ती सज्जन माणसामध्ये दिसते. जगण्याची कृती ही दोनही कवींची आस्था होती. त्यांच्या मनुष्यत्वाचे उद्दिष्ट होते.

तुकाराम :
दुजे खंड तरी/उरला तो अवघा हरि/आपणाबाहेरि/नलगे ठाव धुंडावा ।।१।।
इतुलें जाणावया जाण/कोड तरी मनें मना/पारधीच्या खुणा/जाणे तेणेंचि साधावया।।२।।
देह आधीं काय खरा/देहसंबंध पसारा/बुजगावणें चोरा/रक्षणसें भासतसे ।।३।।
तुका करी जागा / नको वासपूं वाउगा/आहेसि तूं अंगा/अंगीं डोळे उघडीं।।४।।
(तुकारामाची गाथा, अभंग २०)

म्हणजेच,
ज्ञानाने मनातील संभ्रम नाहीसे झाले की मनाच्या गाभाऱ्यातला हरी स्पष्ट दिसतो, त्याला इतरत्र शोधावा लागत नाही ।।१।। शिकाऱ्याच्या कला ज्याप्रमाणे शिकाऱ्याला माहीत असतात त्याप्रमाणे प्रत्येकाने चतुराईने हरीला जाणून घेतले पाहिजे ।।२।। चोराला बुजगावणे पिकाचे रक्षक आहे असे वाटते; पण तो भ्रम आहे. तसाच विषयांचा भोग घेणारा देहही नाशिवंत आहे; त्यामुळे देह आणि पारिवारिक संबंध हाही भ्रम आहे ।।३।। हे माणसा तू विनाकारण दु:खी होऊ नकोस; कारण तू स्वत: हरी आहेस ।।४।।

आन्गेलस सिलेसिउस :
Gott findet man mit Nichtsuchen
Gott ist nicht hier noch da. Wer ihn begehrt zu finden,
der lass'sich Hand 'und Fuβ' und Leib und Seele binden.
(देर शेरुबिनीश वान्डर्स्मान, पहिले पुस्तक, १७१)

म्हणजेच,
इतरत्र शोधून देव सापडत नाही.
देव इथे तिथे नसतो. जो त्याला शोधण्याचा प्रयत्न करतो.
त्याला देह आणि आत्म्याच्या मीलनातच देव सापडतो.

Der Himmel ist in dir
Halt an, wo laufst du hin, der Himmel ist in dir;
Suchst du Gott anderswo, du fehlst ihn fur und fur.
(देर शेरुबिनीश वान्डर्स्मान, पहिले पुस्तक, ६२)

म्हणजेच,
तुझ्यात आकाश सामावलेले आहे.
थांब, तू कुठे पळत आहेस? आकाश तुझ्यात सामावलेले आहे.
तू देवाला इतरत्र शोधत आहेस का? तर तू नक्कीच त्याला गमावशील.
Sei mehr als ein Mensch
Erkenne selbar dich. Wer sich erkennen kann,
Trifft inner sich oft mehr als eine Menschen an.
(देर शेरुबिनीश वान्डर्स्मान, पहिले पुस्तक)

म्हणजेच,
माणूस म्हणून राहण्यापेक्षा अधिक काही मिळव.
तुला स्वत:ला ओळख. जो स्वत:ला अंतर्बाह्य ओळखतो.
त्याला स्वत:तच नवी अनुभूती मिळते.

दोनही कवींच्या वरील ओळी देव स्वत:त आहे, हे व्यक्त करतात. तुकारामांनी स्वत:मधला देव शोधण्यासाठी शिकारी आणि बुजगावणे हे सोपे दृष्टान्त दिले आहेत. आन्गेलस सिलेसिउसने आकाशाचे प्रतीक वापरले आहे.

कवितेच्या माध्यमातून या कवींनी ईश्वराशी संवाद साधला आहे आणि अंतरात्म्याला परमोच्च सुखाचे निधान म्हटले आहे. या उदाहरणांवरून कवी ईश्वराशी एकरूप होण्याची इच्छा स्पष्ट करतात. भौतिक जीवनातील मूर्त-अमूर्त गोष्टींना मर्यादा,

बंधने आहेत; ईश्वराला नाही. ईश्वर हा चराचरात भरलेला आहे, अमर्याद आहे. त्याला मोजमापाची परिमाणे नाहीत. भौतिक जगात ईश्वराला शोधण्याची आवश्यकता नाही. देव इतरत्र कुठेही नसतो; तो माणसातच असतो. माणसाने अंतर्मुख होऊन स्वत:लाच ओळखले पाहिजे.

दोनही द्रष्ट्या कवींच्या लिखाणात साम्य आहे. देव माणसातच पाहावा ही शिकवण दोन्ही कवींनी दिली आहे. परंतु ही शिकवण साहित्यकृतीपुरतीच मर्यादित नाही. कवितेचा वाचक असो व सामान्य माणूस - ज्याला तळमळीने परम तत्त्वाच्या मार्गावर चालायचे आहे, त्याला देव स्वत:तच शोधावयाचा आहे. सतराव्या शतकातील ह्या दोन्ही द्रष्ट्या कवींच्या काव्यातून, त्या शतकाची सांस्कृतिक ओळख होते आणि ह्या संवादातून विचारांमधील साम्य दिसून येते. या सांस्कृतिक तुलनेतून कल्पना आणि दृष्टिकोन यांचीही ओळख होते. सतराव्या शतकातील मनुष्यत्वाचे उद्दिष्ट माणसाने स्वत:तच देव शोधावा या उद्बोधनाचे होते असा विचार दोनही द्रष्ट्या कवींनी समाजमानसात पोचविलेला दिसून येतो. ■

**संदर्भ :**


( १ ) एलीन्गर, जॉर्ज (संपा०).आन्गेलस सिलेसिउस : सेम्तलिश पोएटीश वेर्क उंड आईन आउसवाल आउस साईनेन स्त्राइटश्रीफटन, बर्लिन : प्रोपिलेन फेर्लाग, १९२३.

( २ ) इंगोले, कृष्णा. तुका म्हणे : तुकाराम अवतरणकोश, औरंगाबाद : साकेत प्रकाशन, २००१.

( ३ ) कुलकर्णी, अ० रा०. मेडिव्हल महाराष्ट्र, पुणे : डायमंड प्रकाशन, २००८.

( ४ ) गेएरदृत्स, हान्स (संपा०). डॉयच लिटराटूरगेशिष्ट इन आय्नेम बांड, बर्लिन : फोल्क उंड विसन फोल्क्सआयगेनर फेर्लाग, १९६५.

( ५ ) ग्रेदिंगर, लुईस (संपा०). शेरुबिनीश वान्डर्स्मान : क्रीटीश आउसगाब. स्टुटगार्ट : रेक्लाम, २००६.

( ६ ) ग्योसमान, विल्हेल्म. डॉयच कुलटूरगेशिष्ट इम ग्रुंडरीस, म्युनिक : मॅक्स ह्युबर फेर्लाग, १९७८.

( ७ ) घैसास, दिवाकर. दैनंदिन तुकाराम गाथा, मुंबई : मनोरमा प्रकाशन, २००१.

( ८ ) दातार, मुकुंद. तुका म्हणे : श्री तुकारामांच्या निवडक ३६६ अभंगांचे भावार्थ-लेखन, पुणे : स्नेहल प्रकाशन, १९९९.

( ९ ) चित्रे, दिलीप. वोर्ट देस तुकाराम्स; भाषांतर लोथार लुट्झ; म्युनिक : ए १ प्रकाशन, १९९९.

(१०) चित्रे, दिलीप. सेज तुका - १ : सिलेक्टेड पोएम्ज ऑफ तुकाराम. पुणे : जॉनथायमर कल्चरल असोसिएशन, १९९१.

(११) जोग, विष्णुबुवा (संपा०). सार्थ तुकारामाची गाथा, पुणे : सरस्वती ग्रंथ भांडार, १९९९.
(१२) परांजपे, ए० सी०. सेल्फ अँड आयडेण्टिटी इन मॉडर्न सायकॉलॉजी अँड इंडियन थॉट. न्यूयॉर्क : प्लेनुम प्रेस, १९९८.
(१३) बाउमान, बार्बरा/ओबेर्ले, बिर्गीता. डॉयच लिटराटूर इन एपोखन; म्युनिक : मॅक्स ह्युबर फेर्लाग, १९८६.
(१४) बॉयटीन, वोल्फगांग/एहलर्त, क्लाउस, डॉयच लिटराटूर गेशिष्ट फोन अन्फेन्गन बीस झुर गेगेन्वार्त. स्टूटगार्ट : जे०बी० मेत्झ्लर, १९७९.
(१५) सरदार, गं० बा०. संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती. मुंबई : लोकवाङ्मय गृह, २००४.
(१६) सानप, किशोर. समग्र तुकाराम दर्शन, नागपूर : विजय प्रकाशन, २००८.
(१७) श्प्योरी, एलिसाबेथ (संपा०). देर शेरुबिनीश वान्डर्स्मान आल्स कुन्स्तवेर्क; झ्युरिक : आत्लांतीस फेर्लाग, १९४७.

## इंग्रजी आणि मराठी

इंग्लिशमधले Common Gender असणारे Friend, Agent हे शब्दसुद्धा फार त्रासदायक आहेत. फ्रेडरिक फोरसिथलिखित कादंबरीचा (मध्यस्थ) अनुवाद करताना एक अशीच गंमत झाली. विमानात नायकाच्या शेजारच्या आसनावर एक व्यक्ती येऊन बसते, असा उल्लेख पहिल्याच पानावर आला आहे. ही व्यक्ती म्हणजे स्पेशल एजंट सॅम सोमरव्हिल. वास्तविक, ही व्यक्ती एक सुंदर तरुणी असून तिचं नाव सामंथा आहे; परंतु ही गोष्ट वाचकाला इतक्यात कळू द्यायची नाही, असं लेखकाच्या मनात आहे. त्यामुळं लेखकानं मोठ्या चतुराईनं Agent Sam Sommerville sat next to him असं लिहून टाकलं. ती व्यक्ती - म्हणजेच एजंट सॅम - हा पुरुष नसून ती एक स्त्री आहे, ही गोष्ट वाचकांपाशी इतक्यातच उघड करायची नसली, तरीपण अनुवादकाला हे गुपित माहीत आहे ना? मग आता कठीण परिस्थिती. मराठी व्याकरणव्यवस्थेनुसार पुरुष असेल तर 'बसला' आणि स्त्री असेल तर 'बसली'. तर अशा छोट्या छोट्या आव्हानांना अनुवादकाला वेळोवेळी सामोरं जावं लागतं.

- लीना सोहोनी, 'दै० सकाळ', रविवार, दि० २१ फेब्रुवारी २०१६

# मराठीचे संशोधन आणि संशोधक

सर चिंतामणराव देशमुख यांच्या प्रेरणेनं, बाळासाहेब खेर यांच्या पाठिंब्यानं मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या आधारानं आणि प्रा० अ० का० प्रियोळकरांसारख्या प्रख्यात संशोधकाच्या अथक परिश्रमानं १९४८ मध्ये १ फेब्रुवारीला 'मराठी संशोधन मंडळ' ही संस्था सुरू झाली. ही संस्था सुरू व्हावी, म्हणून मा० सी० डी० देशमुखांनी खास सूचना केली आणि इतर मंडळींनी ती उचलून धरली. मराठी भाषा-वाङ्मयाचे संशोधन करणारी खास स्वतंत्र संस्था महाराष्ट्रात नव्हती, त्यामुळं त्यांनी अशी सूचना केली. आज ७० वर्षे संस्था कशीबशी टिकून आहे.

या संस्थेला मुंबई विद्यापीठाची कायम स्वरूपाची मान्यता आहे. मराठी विषयात पीएच०डी० आणि एम०ए०(संशोधनाद्वारे) या मंडळाद्वारे करता येते. गेली ५० वर्षे ही मान्यता आहे, तरीही मंडळातून किती पीएच०डी० स्नातक आतापर्यंत बाहेर पडले? जेमतेम १०-१२ जणच. (अर्थात ते सर्वच नामवंत संशोधक म्हणून पुढं लौकिकास पोचले.) एम०ए०चा एकही विद्यार्थी नोंदवला गेला नाही. अशी अवस्था विद्यापीठाच्या संलग्न संस्थेत आहे, इतकेच काय ही संलग्न संस्था आहे, हेच विद्यापीठाच्या मराठी विभागाला आणि मराठीच्या तमाम प्राध्यापकांना ज्ञात आहे की नाही, कोण जाणे!

अ० का० प्रियोळकरांच्या नावानं मुंबई विद्यापीठात मराठी विषयातल्या उत्कृष्ट प्रबंधाला दर वर्षी पारितोषिक दिले जाते. या पारितोषिक समितीवर मी पाच वर्षे काम केलं आहे. सादर झालेले प्रबंध त्या वेळी मी पाहिले आहेत. मराठीच्या एकाही प्रबंधात संशोधन पद्धती, उद्दिष्टे, व्याप्ती, मर्यादा, पूर्वाभ्यास असा भाग मला जरासुद्धा सापडला नाही. शास्त्रीय सूची नव्हती. एखाद्यानं आस्वादक समीक्षेनं ग्रंथ लिहावा तसे लेखन, डेटा, डेटा विश्लेषण दूरच राहिले. याला संशोधन का म्हटलं गेलं ते मार्गदर्शक वा ते विद्यार्थीच जाणोत. संशोधन पद्धतीचा पत्ताच नसलेले मार्गदर्शकही थोर आणि त्यांचे विद्यार्थी तर त्याहून थोर.

■

- प्रदीप कर्णिक, 'दै० सकाळ', रविवार, दि० २१ फेब्रुवारी २०१६





अनुक्रमणिका

# लोकवैखरीचा बदलता संसार

- फुला बागूल

सांप्रतचे युग हे ज्ञानाधिष्ठित, कौशल्याधिष्ठित आहे. समाजक्षेत्रात नित्य नव्या ज्ञानशाखा, कर्मशाखा यांची भर पडते आहे. जागतिकीकरणाच्या अपरिहार्य भासणाऱ्या रेट्यात समाज सर्वांगाने घुसळून निघत आहे. एका अर्थाने एका नव्याच समाजरचनेकडे आपण वळतो आहोत. या नव्याने येऊ घातलेल्या समाजरचनेत साध्य फक्त महत्त्वाचे आणि साधने गौण ठरवली जात आहेत. भांडवलदार किंवा समाजात वर्चस्व राखण्यासाठी अर्थसत्तेची चावी आपल्याच जवळ बाळगणारे जे जे कुणी लोक आहेत त्यांचा एक गट आणि या गटाच्या ध्येयपूर्तीसाठी राबवल्या जाणाऱ्या लोकांचा दुसरा गट असे मार्क्सप्रणित वर्गीकरण आजही मान्य करावे लागते. भलेही या दुसऱ्या मोठ्या गटाला लोकशाही या गोंडस नावाखाली 'आमजनता' म्हटले जात असेल. ही जनता याही समाजरचनेत दुय्यमच असणार आहे. या दुय्यम स्थानावरील आम जनतेच्या दैनंदिन भाषेवर पहिला गट आपण निर्मिलेल्या भाषेचा पगडा बसवतो आहे. पहिल्या गटाने म्हणजे भांडवलदारादी लोकांच्या गटाने निर्मिलेली भाषा समाजातील निम्न वर्ग (यात यच्चयावत मध्यम व कनिष्ठ वर्ग समाविष्ट आहेत.) अनुसरतो आहे. या पहिल्या गटाने स्वार्थी हेतूने नवनवी क्षेत्रे निर्मिली आहेत. नवव्यवस्थेचा उदय ही त्यांचीच कामगिरी आहे. या नव्या व्यवस्थांनी नवी भाषा (नवे शब्द, नवे पदबंध, नवे वाक्प्रचार) आणली आहे. या नव्या भाषेचे स्वरूप रंजक आहे. सौंदर्य-प्रसाधनाचे क्षेत्र पूर्वी आरसा-मेण-कुंकू-यांसारख्या अत्यंत मर्यादित वस्तूंचे क्षेत्र होते. आज सौंदर्यप्रसाधनांची बाजारपेठ मोठी आहे. या नव्या व्यवस्थेने वृद्धावस्था, काळा वर्ण, अनाकर्षकता या बाबी त्याज्य ठरवल्या आहेत, निंद्य ठरवल्या आहेत. सतत तरुण दिसणे, गौरवर्ण मिळविणे, आकर्षक दिसणे या गोष्टींना स्वर्गासमान महत्त्व दिले आहे. या नव्या व्यवस्थेने ॲब्रो पेन्सिल, मश्कारा, फाउंडेशन, आय लायनर, आयशॅडो, कॉम्पॅक्ट पावडर, फेसपॅक, लिप लायनर, आयब्रो, लिपस्टिक, मॅट आणि साईन कलर्स, नेलपेंट, वॅक्सिंग, थ्रेडिंग, हेअर कलरिंग, हेअर हायलायटिंग, परफ्यूम, बॉडी स्प्रे, हेअर स्ट्रेटींग, कन्सिलर, फेशियल, मॅनिक्युअर, पेडीक्युअर, बॉडी स्पा, हेअर स्पा, क्लिनअप, स्टेपकट, यूकट, ॲपल कट, व्हीकट, लेअर कट, स्टेप वुईथ लेअर, ॲडव्हान्स कट, कर्ली हेअर, हेअर सिरप, हेअर टॉनिक, हेअर कंडिशनर, शाम्पू, स्टिमर इ० इंग्रजी शब्द आणले. जाहिरातींचा





अनुक्रमणिका

भडिमार करून आम जनतेच्या आकांक्षा त्यांनीच निर्धारित केल्या. सौंदर्याचे मापदंड त्यांनीच ठरवले. त्यांनी आणलेले हे शब्द माथी मारले. निम्न वर्गाच्याही तोंडी हे शब्द येऊ लागले. १९९०च्या पूर्वी माता-भगिनींच्या तोंडी नसलेले हे शब्द आज सर्रास वापरात आहेत. हे शब्द इंग्रजी आहेत म्हणून त्यांना नाकारावे की, इतर इंग्रजी शब्दांना स्वीकारले तसे त्यांना स्वीकारावे असे प्रश्न निर्माण होतात. जागतिकीकरणात प्रमाणभाषांचा बळी जातो किंवा त्यांचे स्वरूप मिश्र होते. नवव्यवस्थांच्या उदयाने अशी वेळ भाषांवर आली आहे. नवव्यवस्थांनी लादलेले किंवा आम जनतेने स्वत:हून स्वीकारलेले हे नवे शब्द आहेत. ते तसेच स्वीकारावे म्हटले तर भाषिक अस्मिता, भाषाशुद्धी या जुन्याच तक्रारी पुन्हा संभवतात. यातून एक तांत्रिक मार्ग काढता येईल तो म्हणजे या शब्दांना नवी मराठी शब्दरूपे योजणे. अर्थात ती रुजतीलच याची शाश्वती नसली तरी तसा काही प्रयत्न या दिशेने करून पाहता येईल.

| **नवक्षेत्र** | **इंग्रजी शब्द** | **पर्यायी मराठी रूपे** |
|---|---|---|
| सौंदर्य प्रसाधने | आयब्रो पेन्सिल | भुवयांची लेखणी |
| | लिपस्टिक | ओष्ठ काडी |
| | मश्कारा | पापणी-कुंतल मलम |
| | बॉडी स्प्रे | देहफवारा |

या नव शब्दांनी 'नेत्रांजन'सारखे ललितरम्य शब्द हद्दपार करून टाकले. भाषांचा बळी हा असा घेतला जातो. संगणक क्रांती, माध्यम क्रांतीच्या शृंखलेतील इंटरनेट-मोबाईल, संगणक इ०नी आपले जगणे २४ × ७ जखडून टाकले आहे. (२४ × ७ म्हणजे आपले 'अहोरात्र'!) या नव्या क्षेत्राने-ब्राऊजर, अॅन्ड्रॉईड, स्मार्ट फोन, थ्रीजी-फोरजी, डाऊनलोड, व्हायरस, वायफाय, सर्चइंजिन, डोंगल, रिचार्ज, चार्जर, बॅलन्स, रिंगटोन, मिसकॉल, प्राईम टाईम, फॅब्लेट, जीबी. रॅम, इंटर्नल मेमरी, एक्सपांडेबल मेमरी, जी सेंसर, क्वॉड कोअर प्रोसेसर, गुगल, रेडिफ मेल, जी मेल, फेसबुक, व्हाट्सअॅप इ० शब्द आणले आहेत. या इंग्रजी शब्दांना नवी मराठी शब्दरूपे योजली पाहिजेत.

उदा० :

| **नवक्षेत्र** | **इंग्रजी शब्द** | **पर्यायी मराठी शब्द** |
|---|---|---|
| दूरसंचार | पेनड्राईव्ह | मजकूर कुपी |
| | सेल्फी | स्वछायाचित्र |
| | मिसकॉल | हुकलेले बोल/हाक |

'टॅब्लेट'ला 'लेखाशिला' तर लॅपटॉपला 'लघुसंगणक' अशी मराठी वळणाची पर्यायी शब्दरूपे वाचण्यात आली. स्मार्ट फोनमधील नव्या व्हर्जनला तंत्रज्ञांनी 'लस्सी' हे नाव सुचविल्याचेही वाचण्यात आले. मराठी अथवा एकूणच भारतीय वळणाची पर्यायी शब्दरूपे स्वीकारली गेली पाहिजेत.

उदा० नवक्षेत्रांच्या उदयाने पुढील इंग्रजी शब्दांची भर लोकवैखरीत पडली आहे:

| नवक्षेत्र | इंग्रजी शब्द |
|---|---|
| आयुष विज्ञान (आरोग्य) | अँजिओग्राफी<br>अँजिओप्लास्टी<br>बायपास/सिझर/बीपी<br>ब्लॉकेजिस/सिटीस्कॅन/बायोप्सी/केमोथेरपी/प्लॅस्टर, फ्रॅक्चर, अ‍ॅटॅक, किडनी, लिव्हर, |
| हॉटेलिंग | खडी पावभाजी/जैन पावभाजी/मख्खन पावभाजी, मटार पनीर, रगडा समोसा, रगडा कचोरी, रगडा पॅटीस, रगडा खाजा, सोयाबीन चिल्ली, सॅण्डविच, बर्गर, पिझ्झा, सॅलड, स्टार्टर, स्नॅक्स, सॉस, स्पाईसी, केक इ० |

यामुळे 'थालीपीठ'सारखा देशी, समृद्ध संवेद्य शब्द जणू हद्दपार झाला आहे. लोकवैखरीच्या उत्तर-आधुनिक संसारात तो अडगळीत पडल्यासारखा झाला आहे. तीच गत मॅगी नूडल्सच्या पार्श्वभूमीवर 'शेवया' या शब्दाची झाली आहे. तथापि 'दालतडका' हा भारतीय वळणाचा पदबंध निदान दिलासादायक म्हणावा लागेल. 'वांगे', या पालेभाजीस उपहासाने 'एक टांगकी मुर्गी', म्हटले जाते.

कापड उद्योगात जीन्स, मिडी, टॉप, गाऊन, कॅप्री, बर्म्युडा, वनपीस, जॅकेट हे शब्द येतात. वस्त्रप्रावरणाच्या उद्योगातील या इंग्रजी शब्दांसह लाचा (घागरा) ओढणी, खाणी हे भारतीय वळणाचे शब्द लोकवैखरीत रुजले आहेत. 'विजार' हा शब्द तर प्राचीनच वाटावा अशा पार्श्वभूमीवर या विजारीची आकारमानानुसार नावे आहेत : एक-चतुर्थांश विजार म्हणजे अंडरवेअर, दोन-चतुर्थांश विजार म्हणजे बर्म्युडा तर तीन-चतुर्थांश विजार म्हणजे कॅप्री. याखेरीज खमीस/ सदरा हे शब्द जाऊन 'शर्ट' हा इंग्रजी शब्द रुजला. त्यातही एक्सेल, डबलएक्सेल, लार्ज अशी लांबी-रुंदी-अधिष्ठित शब्दरूपे योजली जात आहेत.

महिला वर्गाच्या तोंडी सौंदर्यप्रसाधनांशी निगडित शब्द प्रामुख्याने येऊ लागले आहेत. या अंगाने 'स्त्रियांची भाषा' विस्तारली आहे. मूळ सात रंग प्रचलित असूनही भगिनींनी या मूळ रंगांच्याच भडक अथवा फिकट रंगच्छटांवरून नवे रंग व त्यांची

नवी शब्दरूपे प्रचलित केली आहेत.

उदा० राणी कलर - रामा कलर - अबोली कलर -

सांप्रतच्या ई-युगात पुरुषांचीही भाषा विस्तारली आहे. संगणक व स्मार्ट फोन हाताळणाऱ्या पुरुषांच्या तोंडी ई-युगाची इंग्रजाळलेली भाषा येते आहे.

लोकवाणीच्या अंगाने विचार करू जाता निम्न वर्गातील लोकांच्या तोंडी येणारे शब्द अभ्यासले जायला हवेत. सट्टा-जुगार खेळणाऱ्या लोकांत गरीब, मजूर अशा लोकांची संख्या नेहमीच जास्त असते. या लोकांच्या तोंडी झन्नामन्ना-तीनपत्ती-मांगपत्ती हे शब्द येतात. सट्टा खेळणाऱ्या लोकांचा संबंध आकड्यांशी येतो. मात्र हे लोक गणितातल्या पुस्तकातले अंक न उच्चारता त्यांना त्यांनी वेगळी नावे दिली आहेत

उदा० :

| व्यवसाय क्षेत्र | शब्द | अर्थ (गणितीय अंक) |
|---|---|---|
| सट्टा (मटका) | मेंढी | शून्य |
| | लंगडा | सात |

नोकरदार लोकांचाही संबंध गणितीय अंकाशी येत असला तरी त्यांनीही संख्यांना सांकेतिक नावे दिल्याचे आढळते.

उदा० :

| -- | लोकवैखरीतील शब्द | अर्थ |
|---|---|---|
| -- | पेटी | एक लक्ष |
| -- | खोका | एक कोटी |

विशेषत: निवडणुकीच्या काळात चर्चेच्या ओघात पैशांच्या देवाण-घेवाणी संदर्भात उपरोक्त शब्द वापरले जातात. व्यक्तिवर्णनासाठी, व्यक्तीचे गुण अवगुण सांगण्यासाठी सुद्धा लोकव्यवहारात गणितीय अंकांशी निगडित शब्दप्रयोग प्रचलित आहेत.

| लोकवैखरीतील प्रचलित शब्द | अर्थ |
|---|---|
| छप्पन्न टिकल्या | कट कारस्थानी |
| दसनंबरी | चलाख |
| चारशे वीस | फसवणारा |
| छक्का | नपुंसक-दुबळा |
| चोवीस बाय सात | अहोरात्र |





अनुक्रमणिका

खानदेशातील दुर्गम भागात म्हणजे सातपुड्याच्या कुशीतल्या खोऱ्यात आरोग्यसेवा पुरेशा क्षमतेने कार्यरत नाहीत. आजारी व्यक्तींसाठी ॲम्ब्युलन्स (रुग्णवाहिका) मिळतेच असे नाही. तेव्हा रुग्णाचे नातेवाईक अशा रुग्णवाहिकेची वाट न पाहता दोन बांबूंना चादर अथवा गोधडी बांधून लांब झोळी तयार करतात. त्या झोळीत रुग्णाला झोपवून दवाखान्यापर्यंत पोचवतात. या झोळीला खानदेशातील पत्रकारांनी 'बॉम्बूलन्स' हे नवे नांव दिले आहे. समूहाची सर्जनशीलता येथे प्रत्ययास येते. इंग्रजी-मराठी संमिश्ररूपे हा प्रकार अन्यत्रही आढळतो उदा० फी (शुल्क) या इंग्रजी शब्दाचे अनेकवचन फिया (अनेकवचनी रूप) असे मराठी वळणाचे (सुई-सुया) झालेले दिसते. 'परवडेबल' या संमिश्र शब्दातही दिसतो. 'एक्स्पांडेबल'च्या धर्तीवरील 'परवडेबल'सारखे आणखी काही शब्द घडवले जातीलही. नवशब्द हवे तसे घडविण्याचे स्वातंत्र्य असले तरी अशी शब्दरूपे लोकसमूहाकडून स्वीकारली गेल्यानंतर त्यांना पूरके तरी कसे म्हणणार? साधारण १९९०च्या आसपास हॉटेलात चहाच्या दर्जावरून भाव व त्यांची स्वतंत्र नावे प्रचलित होती. चांगल्या म्हणजे घट्ट, जास्त उकळलेल्या, फक्त दुधात बनवलेल्या चहास 'टक्कर' म्हटले जाई. अशा चहास काही ठिकाणी 'कडकमिठी' असेही म्हटले जाई. लोकवैखरीत काबाडकष्ट करणाऱ्यास 'कष्टाळू' म्हटले जाते. शब्दरचनेच्या अनुकरणाची प्रवृत्ती समाजात असल्याने मग त्या धर्तीवरील नवे शब्द घडवले जातात. प्रणयाळू, स्मरणाळू अशी नवरूपे साकारतात. मागे एकदा वृत्तपत्रीय लेखनात मुंबईच्या युवा वर्गाच्या तोंडी येणाऱ्या शब्दांची चर्चा वाचण्यात आली. त्यातला एक सांकेतिक शब्द होता 'BHMG' त्याचे पूर्णरूप होते- 'बडा होके माल बनेगी'! तारुण्याचा स्पर्श न झालेल्या, तारुण्यात आल्यावर मादक दिसू शकेल अशा मुलीसाठी ही अतार्किक शब्दरचना आहे. अशा शब्दरचना समूहाकडून बनवल्या जातात. कामचलाऊ स्वरूपाचे संज्ञापन त्याद्वारा साधले जाते.

समूहाला अशा शब्दांद्वारे होणारे संज्ञापन महत्त्वाचे वाटते. अशा शब्दांची व्युत्पत्ती तर्कहीन आहे हे त्यांच्या गावीही नसते. लोकजीवनात विशेषत: शहरी, निमशहरी भागात असाच एक शॉर्ट फॉर्म (लघुरूप) प्रचलित आहे, तो म्हणजे 'TTMM'. याचे पूर्णरूप आहे 'तुझे तू माझे मी.' हॉटेलात सर्वांनी मिळून जायचे. बिल मात्र प्रत्येकाने स्वतंत्रपणे भरायचे. प्रवासाला सर्वांनी एकत्रित जायचे. भाडे मात्र ज्याचे त्याने भरायचे - अशा व्यवस्थेसाठी हे लघुरूप लोकवैखरीत चांगलेच प्रचलित आहे.

सार्वजनिक जीवनातही वैयक्तिक जीवन जगण्याचा हक्क सुरक्षित असावा, या उत्तरआधुनिक मानसिकतेतून हा प्रकार आणि त्याचे सूचन करणारे शाब्दिक लघुरूप तयार झाले आहे. कुठल्याही संदर्भग्रंथात, व्याकरणग्रंथात समाविष्ट नसलेले हे शब्द, वाक्प्रचार लोकवैखरीत मात्र सुखनैव नांदत असतात. सामाजिक भाषा-विज्ञानात लिखित





अनुक्रमणिका

भाषेपेक्षा मौखिक भाषा विचारात घेतली जाते. यामुळे लोकवैखरीच्या अभ्यासास चालना मिळाली. लोकवैखरीत पुढील वाक्प्रचार प्रचलित आहेत :

| वाक्प्रचार | अर्थ |
|---|---|
| ( १ ) गोळ्या संपणे | वेड्यासारखे वागायला प्रारंभ करणे |
| ( २ ) फुटासची गोळी घेणे/ कलटी मारणे | निघून जाणे |
| ( ३ ) लोच्या करणे | गडबड घोटाळा करणे |
| ( ४ ) बूच लावणे | थांबवणे, विरोध करणे |
| ( ५ ) चमचेगिरी करणे | अनुनय करणे |
| ( ६ ) टोपी लावणे/ घालणे | लुबाडणे/स्वार्थ साधणे |
| ( ७ ) खिसा गरम करणे | लाच देणे |
| ( ८ ) टेबलाखालून घेणे | अनधिकृतरीत्या पैसे घेणे, लाच स्वीकारणे |
| ( ९ ) फालकं मारणे | कमिशन खाणे (मधल्या मध्ये पैसे खाणे) |
| (१०) डोकं लावणे | हुज्जत घालणे |
| (११) धुऊन घेणे/ धुणे | चोप देणे, लुबाडणे |
| (१२) चट्टी बसणे | भुर्दंड बसणे |
| (१३) लंबे होणे | घायकुतीस येणे/ निघून जाणे. |
| (१४) पुडी सोडणे | थाप मारणे |
| (१५) सात जाणे पाच राहणे (सात गेले पाच राहिले) | अवसान गळणे |
| (१६) सटकणे | (पूर्वीचा अर्थ) निसटणे<br>आजचा अर्थ-नियंत्रण गमावणे/विवेक हरविणे. |
| (१७) गेम करणे | बंदोबस्त करणे/ खून करणे |
| (१८) रडारवर असणे | पाळत असणे. |
| (१९) चमकोगिरी करणे | प्रसिद्धीच्या झोतासाठी धडपडणे |
| (२०) एरंडोली करणे/ मांडवली करणे | मधला मार्ग स्वीकारणे, तडजोड करणे. |
| (२१) काड्या कोरणे | उपद्रव देणे. |





अनुक्रमणिका

मनोरुग्णांची औषधे संपली, ती पुन्हा घेतली नाहीत तर ते पुन्हा वेड्यांसारखे करू लागतात. तत्सदृश कुणी वागायला लागला की त्याला 'तुझ्या गोळ्या संपल्या का?' असे विचारले जाते. एखाद्याला रागात 'निघून जा' असे सांगायचे झाल्यास 'फूट येथून' असे म्हटले जाते. त्यातून 'फुटासची गोळी घेणे' हा वाक्प्रचार लोकवैखरीत प्रचलित झाला. निरुत्तर झाल्याने निघून जाण्याच्या क्रियेला 'कल्टी मारणे.' असे म्हटले जाते. 'लोच्या' हा शब्द तर चक्क नाटककारांनीच योजला. झाकण (बूच) लावले की, बाटलीतल्या द्रवाचा प्रवाह थांबवता येतो, तत्सदृश अर्थाने एखाद्याची प्रगती आपल्या हिताला बाधक असल्यास त्याच्या मार्गात अवरोध उत्पन्न करण्याच्या क्रियेस लोकवैखरीत 'बूच लावणे' असे म्हटले जाते. बेमालूमपणे लुबाडण्याच्या, गोड बोलून फसविण्याच्या क्रियेस 'टोपी लावणे', 'टोपी घालणे' म्हटले जाते. आपले काम त्वरित अथवा निर्वेधपणे करवून घेण्यासाठी दिल्या जाणाऱ्या बेकायदेशीर आर्थिक प्रलोभनास अथवा देवाण-घेवाणीस 'खिसा गरम करणे', 'टेबलाखालून देणे' ह्या वाक्प्रचारांनी निर्देशित केले जाते. या वाक्प्रचारांच्या निर्मितीमागील घटना रंजक आहे. वाहतूक व्यवसायात बहुतांशी गाडीमालक ड्रायव्हर-क्लिनर यांना वाहन सोपवतात. मालवाहतूक करणारे हे ड्रायव्हर, क्लिनर रस्त्यात दुसऱ्याच व्यापाऱ्याचा माल ट्रकच्या मागील भागात म्हणजे ट्रकचे झाकण समांतर उघडून त्यावर ठेवून वाहतूक करतात. याद्वारे मिळालेल्या भाड्याचे पैसे ते मालकाला अंधारात ठेवून स्वत:कडेच ठेवून घेतात. ट्रकच्या या झाकणास 'फालकं' म्हणतात. या फालकावर माल ठेवून वाहतूक करून अतिरिक्त पैसे मिळविण्याची ही शक्कल म्हणजे 'फालकं मारणे' होय. कोणत्याही मार्गाने फसवून अतिरिक्त पैसे लाटण्याच्या क्रियेस त्यामुळे 'फालकं मारणे' असे म्हटले जाऊ लागले. 'धुऊन घेणे' या वाक्प्रचाराचा लोकव्यवहारातील अर्थ 'चोप देणे' आणि लुबाडणे, लुटणे असा दुहेरी होतो.

रोडरोमियांना जेव्हा समूहाकडून चोप बसतो तेव्हा 'धुतले' असा या कृतीचा निर्देश केला जातो. निवडणुकीत मते मिळविण्यासाठी एखादा उमेदवार असंसदीय मार्गाचा अवलंब करताना पैसे वाटतो. चाणाक्ष अथवा स्वार्थी मतदारही मग ही संधी सोडत नाही. असा मतदार अशा उमेदवाराकडून जास्तीत जास्त पैसे लाटण्याचा प्रयत्न करतो. अनेक मतदारांकडून असे लुबाडले गेल्यावर, लुटले गेल्यावर या घटनेचा निर्देश 'धुऊन घेणे' असा केला जातो. 'आता माझी सटकली' सारख्या गीतांमुळे 'सटकणे'चा अर्थ नियंत्रण हरवणे, राग येणे, विवेक हरवणे असा घेतला जाऊ लागला किंबहुना अधोरेखित झाला.

लोकवैखरीत पुढील वाक्प्रचार प्रचलित आहेत.

| | |
|---|---|
| तिर्री देणे | खोटे बोलणे |
| छपरी देणे | स्वत:ची अतिशयोक्त स्तुती करणे |
| पंचायती मार देणे | समूहाने एखाद्याला मारणे |
| बत्ती देणे | मारणे, जास्त व वेगाने जेवणे |
| झापणे/ फाडणे | रागावणे, खडसावणे |

खानदेशातील जळगांव जिल्ह्यात एरंडोल नावाचे तालुक्याचे शहर आहे. येथील व्यापारी समंजस, समन्वयवादी म्हणून ख्यातनाम होते. मालाची खरेदी करताना किमतीची घासाघीस होते. यात वेळ जातो, म्हणून एरंडोलचे व्यापारी मधली किंमत निश्चित करून व्यापारी व ग्राहक या दोहोचे समाधान साधत. त्यांच्या या धोरणावरून 'एरंडोली करणे' हा वाक्प्रचार रूढ झाला. आता तर हा वाक्प्रचार देणगी देणे, हुंडा ठरविणे अशा अनेक अर्थव्यवहारांतही वापरला जातो. तिर्री देणे, हा वाक्प्रचार थाप मारणे या अर्थाने योजला जातो. मात्र त्याची निर्मिती तर्कापलीकडे आहे. अशी अतार्किक किंवा तर्कबाह्य निर्मिती 'छपरी देणे', 'बत्ती देणे' या वाक्प्रचारांची देखील आहे. आवडता पदार्थ ताटात असणे व खूप भूक लागलेली असणे अशा समयी वेगाने व जास्त जेवण्याच्या क्रियेस 'बत्ती देणे' असे म्हटले जाते.

'अनुयायी' शब्दास कालांतराने वेगवेगळे पर्यायी शब्द समूहाकडून योजले जाऊ लागले. अनुयायी-चमचा-पंटर असे हे शब्दांतर होत गेले. मग यातूनच 'चमचेगिरी करणे', 'चमकोगिरी करणे' हे नवे वाक्प्रचार तयार झाले. राजकारण्यांना प्रतिष्ठा प्राप्त झाल्यापासून त्यांचे शिष्यत्व मिरविण्याची हौस भागवणाऱ्यांना 'चमचे' म्हटले जाते. संजय दत्त या अभिनेत्याच्या 'मुन्नाभाई एम०बी०बी०एस०' या चित्रपटामुळे 'गांधीगिरी' शब्द माध्यमांनी जन्माला घातला. मग याच धर्तीवर 'भाईगिरी' (दादागिरी) हा शब्द तयार झाला. कुलकर्णी नामक कवीने अमेरिकेस उद्देशून 'युद्धट' हा नवा पदबंध योजला. (युद्धखोर + उद्धट). माध्यमांनी दहशतवादी कृत्यांचे वार्तांकन करतांना 'मास्टर माइंड' हा इंग्रजी पदबंध लोकवैखरीत इतका रुजवला की, आता समूहातील हुशार माणसाला कोणत्याही संदर्भाने 'मास्टर माइंड' म्हटले जाते. व्हॉट्स ॲप या नव्या सुविधेमुळे 'ॲडमीन' हा शब्द तोंडी येऊ लागला. 'म्होरक्या' हा शब्द बोलण्यातून हद्दपार झाल्यागत झाला. या युगाने मॅटेनन्स हा शब्दही रुजवला. समाजात नवव्यवसायाचा उदय झाला या नव्या क्षेत्रांनी नवे शब्द आणले.





अनुक्रमणिका

उदा० :

| व्यवसायाची नवी क्षेत्रे | नवे शब्द |
|---|---|
| सिनेमा | सिनेमॅक्स्, बॉक्सऑफीस, सुपर फ्लॉप, मल्टिप्लेक्स्, |
| पाणीपुरवठा | प्लंबर, टेकसॅव्ही प्लंबर, चेंबर |
| माध्यम | इव्हेंन्ट मॅनेजर, डिझायनर, कौन्सिलर, टेलिसर्जन |

लोकवैखरीत समूहाचा स्वतंत्र शब्दसंग्रह असतो. विशिष्ट प्रांतात हा शब्दसंग्रह प्रचलित असतो. त्यामागील संकेतांची जाण असते.

उदा० :

| लोकवैखरीतील शब्द | संकेत |
|---|---|
| टेरिकॉट | भाजीवरील तेलाचा तवंग |
| रापचिक | अप्रतिम |
| टपरा | भंगारयोग्य |
| खावटी | (१) घटस्फोटितांनी द्यावयाची रक्कम<br>(२) नोकरदार मुलाने पालकांना पाठवायचे पैसे<br>(३) निराधारांना राजीव गांधी योजनेअंतर्गत मिळणारी रक्कम |
| डबल इंजिन | नोकरदार पती-पत्नी |
| म्हैस | आर०टी०ओ० |
| कानबाई | कॅन्व्हॉय पॉइंट<br>कॅन्व्हॉय पॉइंटला खानदेशात कानबाई म्हटले जाते. एकतर कॅन्व्हॉयचा उच्चार जमत नाही म्हणून, उच्चार साम्य म्हणून कानबाई. कानबाई हा खानदेशाचा प्रमुख उत्सव आहे. म्हणूनही कॅन्व्हॉयला (कानबाई-पार्वती) म्हटले जाते. |
| राडा | घोटाळा, दंगल, हाणामारी. |

माध्यमांकडून बऱ्याचदा नवे पदबंध जनमानसात रुजवले जातात. माध्यमांच्या प्रभावामुळे हे होते. एखादी घटना घडते. तिला नाव दिले जाते. ब्रेकींग न्यूज अंतर्गत ती घटना पुन:पुन्हा दाखविली जाते. वर्णिली जाते. यातून विशिष्ट पदबंधांची भाषेत भर पडते. उदा० : लव्हजिहाद - घर वापसी - ऑनर किलिंग -
इंडस्ट्रीअल कॉरीडॉर - लिव्ह ईन

'माफिया' हा शब्द 'स्मगलर'च्या ऐवजी रुजला, याचे आश्चर्य वाटते. बहुधा इंग्रजी शब्द रुजतात हा अनुभव आहे. माध्यमांनीच मग 'माफिया' शब्द उचलून धरला. भूमाफिया रेतीमाफिया, शिक्षण माफिया असे नवे शब्द माध्यमांची निर्मिती होय. राडेबाज कार्यकर्ते, गळेपडू कार्यकर्ते अशी नवविशेषणे देखील माध्यमांनीच निर्मिली आहेत. आयटम साँग, बॉक्स ऑफिस (गल्लापेटी)हे शब्दही लोकवैखरीत रुजले आहेत. ट्विटरद्वारा संवाद साधण्याच्या क्रियेला 'टिवटिवाट करणे' (चिवचिवाटशी ध्वनिसाम्य), स्मार्ट फोनधारकांनी प्रचलित केलेला 'सेल्फी' हा शब्द, बाईक चालविणाऱ्या धाडसी स्त्रियांच्या सदरास 'मी बाईकर्णी' हे नावही (नाडकर्णीशी ध्वनिसाम्य). कॉर्पोरेट जगतातील 'ब्रँड ॲम्बेसेडर' (सदिच्छादूत) हा शब्द माध्यमांनी लोकवैखरीत रुजवला आहे. हातभट्टीच्या दारूची विविध नावे देखील पिणाऱ्यांच्या तोंडी आहेत. खोपडी, कोंबडी, ठर्रा, केवट ही तर विषारी दारूचीच नावे आहेत. कोल्हापुरी चप्पल बनविणाऱ्यांनी गब्बर, सरपंच, पोलीस पाटील ही चपलांची नावे ठेवली आहेत. धिप्पाड व्यक्तीसाठी 'गब्बर चप्पल' तर कर्रकर्र आवाज करणाऱ्या चपलेस सरपंच चप्पल, पोलिस पाटील ही नावे दिली आहेत. व्यक्तिमत्त्वास अनुषंगून ही नावे दिलेली आढळतात.

युवकांची स्वत:ची खास शब्दावली व त्या मागील संकेत मजेदार आहेत, लोकवैखरीत ते प्रचलित आहेत. उदा० :

| शब्द | संकेत |
|---|---|
| दांडीयात्रा | पायी चालणे/ऑफिसला दांडी मारणे |
| ढापण्या/बॅटरी/कंदील | चष्मा लावणारा |
| खंबा | दारुची मोठी पूर्ण बाटली |
| पेताड | दारुड्या |
| सत्संग | सामूहिक ओली पार्टी |
| टांगा पलटी घोडे फरार | अतिमद्य प्राशनाने बेताल बडबडणारा, मातीत लोळणारा |
| सनन | अत्यंत चविष्ट |
| चपारा | उत्कृष्ट, स्त्रीबाबत (मादक) |





अनुक्रमणिका

इंग्रजी लघुरूप शब्दांचे सोयीस्कर पूर्णरूप केलेलेही लोकवैखरीत आढळते -

उदा० : MBBS - म्हैस बांधता बांधता सुटली

ATM - असतील तर मिळतील.

'नाश्तापाणी'च्या धर्तीवर नशापाणी, पगारपाणी असे मजेदार पदबंध लोकवैखरीत नांदत आहेत. चित्रपट व डान्सबार संदर्भातील काही संमिश्र पदबंध उच्चारले जातात.

उदा० : बार बाला / बोल्ड बाला / आयटम बाला

असे कितीतरी पदबंध, वाक्प्रचार लोकवैखरीत सुखनैव नांदत आहेत. त्यातील काही समाजांतर्गत नव्याने उदयास आलेल्या नव्या कार्यक्षेत्रांची देणगी आहेत. तर काही पदबंध, वाक्प्रचार ही सर्वसामान्य आम जनतेची निर्मिती आहे. सुधाकर देशपांडे (१९९८ पृ० ११०) म्हणतात, ''भाषादूषण कोठे मानावे व कोठे मानू नये याची मर्यादा चिपळूणकरांनी दाखवून दिली आहे. इस्टेट, इस्कुरु, रजिस्टर या बायका-पोरांच्या देखील तोंडी रुळलेल्या शब्दांवर त्यांचा कटाक्ष नाही. इडियम किंवा प्रयोगविशेष यावर जेव्हा परभाषा हल्ला करते तेव्हा तो प्राणघातक समजावा असे त्यांचे मत आहे. प्रयोगविशेषापुढे तर्कशास्त्राची मात्रा चालणे नाही. भाषेचे स्वातंत्र्य व स्वारस्य याच्यावरच बरेचसे अवलंबून असते.''[१]

**समारोप**

लोकवैखरीचा संसार उपरोक्त शब्दांनी, पदबंधांनी, वाक्प्रचारांनी बहरला आहे. लोकांच्या तोंडी येणारे, संज्ञापनाचे आपले कार्य चोखपणे पार पडणारे हे शब्द - पदबंध - वाक्यप्रचार व्याकरणाच्या ग्रंथात वा ललित वाङ्मयात आढळत नाहीत. म्हणून त्यांना अस्पृश्य, ग्राम्य म्हणून उपेक्षिणे योग्य होणार नाही. भाषिक लोकशाहीच्या या युगात प्रत्यक्ष उपयोजिली जाणारी, व्यवहारातील भाषा दुर्लक्षित ठेवणेही योग्य होणार नाही. ना० गो० कालेलकर (१९९४ पृ० ८) म्हणतात, ''प्रमाणभूत किंवा लेखनिविष्ट भाषेपेक्षा उच्चार, शब्दसंग्रह, रूपनिर्मिती आणि वाक्यरचना यांच्या दृष्टीने वेगळ्या स्वरूपाची भाषा बोलणारे लोक अडाणी असतात, त्यांच्यावर योग्य संस्कार झालेले नसल्यामुळे किंवा त्यांच्या मुखरचनेतच दोष असल्यामुळे त्यांना कठीण उच्चार करणे जमत नाही, मागासलेपणामुळे ते बिनदिक्कत ग्राम्य शब्द वापरतात इ० समजुती अजून सुशिक्षित लोकांतही आढळून येतात. या समजुती नुसत्या खोट्याच आहेत असे नसून आजच्या लोकशाहीच्या युगात आवश्यक असणाऱ्या समाजजीवनाला त्या घातक आहेत.'' प्रमाणभाषा अथवा बोलीला असणारी क्षेत्रमर्यादा तिलाही आहे. तिलाही परंपरा आहे. तिलाही भूगोल आहे. तिच्यातही नवे शब्द घडविले जातात. ती बोलणारे लोक मोजके निश्चितच नाहीत. ती समूहाचीच भाषा आहे. तिच्या प्रकृतीची आस्थेवाईक चौकशी का करू नये? ■

संदर्भ :
( १ ) कालेलकर, ना०गो० (१९९४) - भाषा : इतिहास आणि भूगोल, मौज प्रकाशन गृह, मुंबई. प्रस्तावना पृ० ८
( २ ) देशपांडे, सुधाकर (१९९८) - विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा भाषा विचार, 'निवडक भाषा आणि जीवन', संपा० - कल्याण काळे, मृणालिनी शहा, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृ० ११०.

चलभाष - 9420605208

## पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ०)
भाषाविज्ञान
भाषांतर
शैली (व्यवहारातील व साहित्यातील)
भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन
परिभाषा
भाषिक वर्तन
भाषाविषयक शैक्षणिक व शासकीय धोरणे
पुस्तक-परीक्षणे
पानपूरके
पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया
आपली भाषिक प्रचीती
मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायाविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये
मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम
कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण
कवितेची भाषा
साहित्याची भाषा
परिभाषाकोशांचा परिचय इत्यादी.

# जपानीच्या निमित्ताने परत मराठीकडे?

**- मेघना पळशीकर**

''जपानी भाषेसाठी असलेल्या बहुतेक सर्व शिष्यवृत्त्या पुण्यातली जपानी शिकणारी मुले मिळवतात. मोठ्या संख्येने आणि अतिशय उत्तम रीत्या, सहजगतेने ही मुले जपानी शिकतात.'' टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या जपानी भाषा विभागाचे तेव्हाचे प्रमुख प्रा० विनय साठे यांच्याकडून गेल्या वर्षी जेव्हा हे ऐकले तेव्हा अशाप्रकारे सहजतेने जपानी शिकण्यामागे या मुलांची मातृभाषा मराठी असण्याचा आणि जपानी-मराठी भाषांच्या संरचनेतील साम्याचा कितपत आणि कसा वाटा आहे या दृष्टीने पाहणी करण्याचे ठरवले.

डेक्कन कॉलेजमध्ये भाषा-विज्ञानाचा अभ्यास करताना जपानी आणि मराठी या दोन भाषांची भाषाकुळे जरी भिन्न असली तरी या भाषांच्या रचनेत, व्याकरणात (व्यवस्थेत) बरेच साम्य आहे हे लक्षात आले होते.

१९९६ साली जेव्हा मी पुणे विद्यापीठाच्या रानडे इन्स्टिट्यूटमधून जपानीचा ॲडव्हान्स डिप्लोमा पूर्ण केला तेव्हा आमच्या वर्गातील मुलांपैकी बहुतेक सर्वजण मराठी माध्यमाच्या शाळेत शिकलेले होते. डॉ० हरी दामले अतिशय उत्तम प्रकारे जपानी शिकवत असत आणि शिकवताना मराठीतून समजावून सांगणे सहजच होत असे.

आता २० वर्षांनंतरही पुण्यातील जपानी भाषेचे बहुतेक सर्वच शिक्षक मराठी भाषक असले तरी बहुसंख्य विद्यार्थ्यांचे शालेय शिक्षण इंग्रजी माध्यमात झालेले आहे. त्यामुळे जपानी-मराठी भाषासाम्याकडे ही मुले कशा पद्धतीने बघतात आणि जपानी शिकताना मराठीच्या प्रभावाचा - निजभाषा-प्रभावाचा - काही परिणाम त्यांना जाणवतो का या दृष्टीने पाहणी करण्यासाठी प्रश्नावली तयार केली.

या प्रश्नावलीतले भाषाविज्ञान, मराठी-जपानीतील साम्यभेदस्थळे यांच्याशी निगडित असलेले प्रश्न या लेखात वगळले आहेत. प्रस्तुत लेखाचा मुख्य भर निजभाषेचा प्रभाव कितपत आहे हे जाणून घेण्यावर आहे.

या पाहणीसाठी पुण्यातील - सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, रानडे इन्स्टिट्यूट, सिंबायोसिस, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, इंडो-जॅपनीज असोसिएशन, नानावटी इन्स्टिट्यूट, कमिन्स कॉलेज या सर्व प्रमुख जपानी भाषा शिकवणाऱ्या केंद्रांची निवड केली होती.





अनुक्रमणिका

या केंद्रात जपानी भाषेचे किमान सत्तर तास प्रशिक्षण पूर्ण केलेली मुले - ज्यांना भाषेची बऱ्यापैकी ओळख झालेली आहे - पाहणीसाठी निवडली होती. पाहणीत भाग घेतलेली सर्वच मुले मराठी निजभाषा असलेली होती. (पुण्यातील जपानीच्या विद्यार्थ्यांपैकी जवळजवळ ९९% मुले मराठी भाषक आहेत.) मुलांना भेटून, त्यांच्याशी बोलून प्रश्नावली भरून घेतली. या मुलांचे शिक्षक मराठी भाषक असून शिकवताना मराठीचा वापर करतात हे लक्षात आले. एकूण १३८ मुलांनी या पाहणीत भाग घेतला. प्रश्नावली भरण्यात सर्वच मुलांनी विशेष रस दाखविला.

प्रश्नावलीतले काही प्रश्न व त्यांची आकडेवारी पुढीलप्रमाणे -

* शालेय शिक्षण कोणत्या माध्यमात झाले?
  मराठी - २९ इंग्रजी - १०९ इंग्रजी/सेमी
* घरात कोणत्या भाषेत बोलता?
  पूर्णपणे मराठी - १२१ मिश्र - १७
* कामाच्या ठिकाणी/कॉलेजमध्ये कोणती भाषा जास्त वापरली जाते?
  फक्त मराठी - ३९ मिश्र - ९९
* तुम्हाला स्वत:ला कोणत्या भाषेत व्यक्त होणे जास्त सोपे जाते ?
  मराठी - ३२ दोन्ही (इंग्रजी/मराठी) १०६
* मराठी भाषा माहीत असल्यामुळे जपानी भाषा शिकणे सोपे आहे असे वाटले का?
  या प्रश्नाला सर्वच मुलांनी 'हो' असे उत्तर लिहिले आहे.

या प्रश्नाचा पुढचा उपप्रश्न 'कशामुळे?' असा होता आणि त्याला आलेली उत्तरे अगदी वेगवेगळी पण रंजक आहेत. अगदी 'दोन्ही भाषांची विचारसरणी सारखी आहे' पासून प्राण्यांच्या आवाजासाठीचे तसेच ध्वनीचे अनुकरण करणारे शब्द दोन्ही भाषांत सारखेच आहेत (उदा० फिदिफिदी-गेरागेरा; रमतगमत-गुझुगुझु) पर्यंत. या प्रश्नाला मुलांनी लिहिलेली काही उत्तरे नमुन्यादाखल पुढे देत आहे!

- निजभाषेतून शिकणे केव्हाही सोपे असते (विशेष म्हणजे हे उत्तर लिहिणारी दोन्ही मुले स्वत: इंग्रजी माध्यमात शिकलेली आहेत.)
- आदरार्थी वाक्यरचना/आदरार्थी सर्वनामे इंग्रजीत नाहीत, मराठीत आहेत.
- 'दोकोमो' - कुठेही; 'ना केरेबा नारानाई'- न करून चालणार नाही इ० शब्दप्रयोगांचे तंतोतंत भाषांतर मराठीतच करणे शक्य आहे.
- इंग्रजी बोलता येत असले तरी इंग्रजी उच्चार नेमके येणे अवघड आहे. जपानीचे उच्चार मराठीसारखेच आहेत आणि म्हणून जपानी बोलायचे दडपण येत नाही.
- मराठीप्रमाणेच जपानी भाषा कशीही वळवता येते... इत्यादी.





अनुक्रमणिका

या संदर्भात अनेक वर्षे पुण्यात जपानी शिकवण्याचा अनुभव असलेल्या प्रा० मीना हुल्लुरकर यांच्याशी बोलताना त्या म्हणाल्या, ''इंग्रजी माध्यमातल्या मुलांना मराठी व्याकरणातल्या सकर्मक-अकर्मक क्रियापदे, कर्तरी/कर्मणी प्रयोग, विभक्ती-प्रत्यय इ० संज्ञा माहीत नसतात. पण उदाहरणार्थ, जपानी 'वा', 'गा', 'नो', 'नी' इ० विभक्ती प्रत्यय शिकवताना 'मराठीत आपण असाच वापर करतो' हे त्यांना माहीत असते.'' याचविषयी इंडोजॅपनीज असोसिएशनच्या प्रा० देशपांडे म्हणाल्या, ''जपानी व्याकरणाच्या तासानंतर जेव्हा मुले 'हं म्हणजे मराठीत हे असं-असं आहे' म्हणतात, तेव्हा त्यांना ते अचूक समजले आहे हे लक्षात येते.''

'तुमच्या वर्गमित्रांशी भाषेविषयी चर्चा कोणत्या भाषेत करता?' या प्रश्नाला जवळजवळ सर्वच मुलांनी 'मराठीत' असे उत्तर दिले.

जपानी-मराठी व्याकरणाचा तुलनात्मक अभ्यास करायला आवडेल, असे काही मुलांनी आवर्जून नमूद केले आहे. जपानी भाषा शिकायला लागल्यापासून रोजच्या बोलण्यातला मराठीचा वापर वाढला असे ४२ (१३८ पैकी) मुलांनी म्हटले आहे.

जपानी-मराठी भाषांतल्या विशेष साम्यांमुळे या भाषा बहिणी-बहिणी म्हटल्या तर आपल्याकडच्या 'माय मरो पण मावशी जगो' या वाक्प्रचाराऐवजी (जपानी-मराठी वाक्प्रचारांचाही स्वतंत्र अभ्यास होऊ शकेल एवढे त्यात साम्य आहे) 'जपानी मावशीची ओळख होताना मराठी आईचीही पुन्हा नव्याने ओळख होते असे म्हणायला वाव आहे.

या संदर्भात इथे इंडोजॅपनीज असोसिएशनच्या प्रा० अश्विनी साठ्ये यांच्या ॲडव्हान्स डिप्लोमाच्या वर्गाचा उल्लेख आवर्जून करावासा वाटतो. या वर्गातली जवळजवळ सर्वच मुले (आठ मुले) मराठी माध्यमाच्या शाळेत शिकलेली होती व 'या मुलांची भाषेची जाण फारच चांगली सखोल आहे,' हे जे त्या म्हणाल्या त्याचा प्रत्यय त्यांच्या या वर्गातील मुलांशी बोलताना आलाच. मराठी आणि जपानी भाषांच्या अनेक बारीक-सारीक पैलूंबद्दल ही मुले भरभरून बोलत होती.

तर-तम भाव दाखविण्यासाठी जपानीत इचिबान (शब्दश: पहिल्या क्रमांकाचं) हा शब्द वापरतात. उदा० - इचिबान ताकाई-सर्वात उंच - शब्दश: 'पहिल्या नंबरचं उंच' याच धर्तीवर सध्याची तरुणाई 'अतिशय उत्तम आहे' म्हणण्यासाठी 'ए नंबर आहे' म्हणताना दिसते. त्यामुळे या तरुणांच्याच भाषेत सांगायचं तर - जपानीच्या निमित्ताने परत मराठीकडे आपण वळत असू तर 'एक नंबर-इचिबानच!'

■

चलभाष - 9764388893





अनुक्रमणिका

# विसर न व्हावा!

- गं० ना० जोगळेकर

मराठीतील लेखनाचे सध्याचे नियम अ० भा० मराठी साहित्य महामंडळाने १९६१मध्ये तयार केले व ते १९६२मध्ये महाराष्ट्र शासनाने स्वीकारल्यानंतर लगेच अस्तित्वात आले. हे नियम तयार करण्यापूर्वी 'शुद्धलेखन' हा एक कायमचा वादाचा विषय होता व महामंडळाचे नियम प्रचारात आल्यानंतरही वाद संपलेला नाही. या वादासंबंधी पुष्कळ तपशीलवार सांगता येईल. पण येथे फक्त महत्त्वाचे टप्पे सांगणे पुरेसे आहे.

( १ ) प्राचीन काळी मराठीत प्रामुख्याने पद्य वाङ्मय होते व ते देवनागरी लिपीत लिहिले जात असे. पद्याला लेखन-नियमांचे काटकोर बंधन असत नाही.

( २ ) सामान्यत: शिवकालापासून गद्य लेखनव्यवहाराचे प्रमाण वाढले. या गद्यासाठी मोडी लिपीचा वापर करण्यात येत असे. त्या काळात मुद्रण अस्तित्वात नसल्यामुळे सर्व भर हस्तलिखितावर असे. मोडी लिपी ही मुख्यत: खाजगी व्यवहारासाठी आणि शासकीय व्यवहारासाठी प्रचारात होती.

( ३ ) १९व्या शतकाच्या प्रारंभापासून या स्थितीत क्रांतिकारक बदल झाला. प्रथम मोडी आणि मग देवनागरी या लिप्या मुद्रणासाठी प्रचारात आल्या. मुद्रणामुळे आणि त्याचा उपयोग केलेली नियतकालिके आणि पाठ्यपुस्तके यांमुळे 'सार्वजनिक गद्य' हा प्रकार अस्तित्वात आला. सामान्यत: १८५० पर्यंत लेखननियमांना फारसे महत्त्व नव्हते. दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर तसेच टिळक, गोडबोले, गुंजीकर इ० व्याकरणकार जसे लिहीत ते इतरांपुढे आदर्श होते. कोणा एका व्यक्तीने किंवा संस्थेने पुढाकार घेऊन लेखननियम ठरवून दिले नव्हते.

( ४ ) दादोबा पांडुरंगांनी 'पुणे प्रांतीची भाषा' स्वीकारून तिचे व्याकरण रचल्यामुळे पुण्यातील भाषेला हळूहळू प्रमाण भाषा म्हणून समाजमान्यता मिळत गेली. कोकणी लेखकांचे बोलणे अधिक प्रमाणात सानुनासिक वर्णांनी युक्त असे असल्यामुळे त्यांच्या लेखनात सकारण किंवा अकारण अनुस्वारांचे प्रमाण फार मोठे असे.

( ५ ) इ० स० १८९८मध्ये का० ना० साने, म० शं० गोडबोले, दि० मो० हातवळणे या तिघांनी मिळून एक पत्रक काढले व आपल्या देवनागरी लेखनात किती ठिकाणी अकारण अनुस्वार येतात ते दाखवून दिले व ही विसंगती दूर केली पाहिजे,

असे मत मांडले. १९०४ मध्ये दि० मो० हातवळणे यांनी 'मराठी भाषेची लेखनपद्धति' या नावाची एक पुस्तिका प्रकाशित केली व तेव्हापासून शुद्धलेखन हा वादाचा विषय बनला. त्या वेळच्या मराठी लेखनात केंस, शेंपूट, फेंस, संवय, सांवळा, लांकूड, येथें, तेथें, कां, कीं, जेव्हां, तेव्हां, केव्हां अशा शब्दांवर अनुस्वार दिले जात. यांतल्या काही अनुस्वारांची कारणे सांगता येतात, पण अनेक अनुस्वार केवळ रूढीने दिले जात असल्यामुळे ते काढून टाकले पाहिजेत, असे श्री० हातवळणे यांनी सुचविले.

( ६ ) त्या वेळचे मुंबई राज्यातील शिक्षण खाते १९०५ पासून नवी पाठ्यपुस्तके प्रसिद्ध करणार होते. तेव्हा या पाठ्यपुस्तकांतून असे बदल करावेत म्हणजे आपोआपच लेखननियमांत सुधारणा होईल असा श्री० हातवळणे यांचा बेत होता. पण त्या वेळच्या अनेक भाषाप्रेमींनी याला विरोध केला आणि यासाठी साप्ताहिके, मासिके अशा नियतकालिकांमधून लेखन प्रकाशित झाले. शास्त्रीय मराठी व्याकरणामुळे नंतर जे ख्यातनाम झाले ते मोरो केशव दामले यांनी तर 'शुद्धलेखन सुधारणा अर्थात सरकारी बंडावा' या नावाचे एक पुस्तक लिहून या क्षेत्रात सरकारी हस्तक्षेप होत असल्याबद्दल कडाडून विरोध केला. त्यांचा लेखननियमांतील सुधारणेला विरोध नव्हता; कारण त्यांनीच असे विधान केले आहे. 'ज्या काळात जे प्रचलित ते शुद्धच' पण यात सरकारने पडता कामा नये. शेवटी 'केसरी'त या विषयावर चार लेख लिहून लोकमान्य टिळकांनी या प्रश्नाची दखल घेतली.' ''बदलत्या काळात आवश्यकतेनुसार लेखननियमांत बदल करण्यास हरकत नाही.'' असे टिळकांचेही मत होत. ''पण त्यासाठी आधी समाजात जागृती करून समाजमन तयार केले पाहिजे.'' असे त्यांना वाटत होते. मराठी ही अजून घडणारी भाषा आहे; ती संस्कृतप्रमाणे पूर्ण बनलेली भाषा नाही, म्हणून सगळे बदल सावधपणे केले पाहिजेत ही त्यांची भूमिका होती.

( ७ ) समाजाचा असलेला विरोध लक्षात घेऊन त्या वेळच्या शिक्षण खात्याने लेखनातली रूढ पद्धतीच चालू ठेवली; त्यामुळे हा वाद तेवढ्यापुरता संपला.

( ८ ) १९२८ मध्ये टिळक चरित्राचा तिसरा भाग प्रकाशित करताना सुप्रसिद्ध लेखक व पुढारी न० चिं० केळकर यांनी ज्या अनुस्वारांचा उच्चार होत नाही, पण जे अकारण दिले जातात अशा अनुस्वारांची हकालपट्टी करून स्वत:पासूनच सुधारणा अंमलात आणली. त्यांच्या या आकस्मिक कृतीमुळे सुशिक्षितांमध्ये खळबळ माजली आणि पुन्हा एकदा नियतकालिकांमधून उलटसुलट मते मांडली जाऊ लागली. तेव्हाच्या प्रसिद्ध 'लोकशिक्षण' मासिकातून नारायण दासो बनहट्टी (श्री० ना० बनहट्टी यांचे वडील) यांनी सात लेख लिहून सुधारणेस विरोध केला व 'मराठीची लेखन-पद्धती' या नावाने आपली पुस्तिका प्रकाशित केली.

( ९ ) १९२९ मध्ये बेळगाव येथे मराठी साहित्य संमेलन भरले होते. त्या वेळी

संमेलनाने एक ठराव करून शुद्धलेखन प्रश्नाचा विचार करण्यासाठी व उपाययोजना सुचविण्यासाठी एक समिती नेमली. या समितीने अनेक अभ्यासकांकडून मते मागविली व शेवटी १९३०च्या मडगाव येथे भरलेल्या संमेलनात आपल्या शिफारशी कळविल्या. संमेलनाने त्या स्वीकारल्या व तेव्हापासून म० सा०प०चे लेखननियम अस्तित्वात आले.

(१०) शेपूट, केस, लाकूड अशा शब्दांवर जे अकारण अनुस्वार दिले जात होते ते या नव्या नियमांत अमान्य झाले, तृतीयेच्या 'ने' आणि 'नी' या प्रत्ययांवर दिले जाणारे अनुस्वारही अमान्य केले. मात्र व्युत्पत्तीने सिद्ध होणारे अनुस्वार दिले पाहिजेत असे ठरविले. मराठीत तत्सम (म्हणजे संस्कृत शब्द) मुळाबरहुकूम लिहिले पाहिजेत असाही नियम केला. एकंदरीत संस्कृतबद्दल आग्रही असलेल्या जुन्या नियमांच्या अभिमानी लोकांची मने दुखवायची नाहीत असा या म०सा०प० नियमांचा हेतू होता.

(११) म० सा० परिषदेचे नियम अस्तित्वात आले तरी लेखनातला स्वैरपणा संपला नव्हता. डॉ० वि० भि० कोलते यांच्या आग्रहामुळे विदर्भ साहित्य संघाने आपले वेगळे नियम ठरविले होते, तर मुंबई विद्यापीठाने जुनेच नियम चालू ठेवले होते. १९६० मध्ये महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली; त्याच वेळी पुणे, मुंबई, नागपूर व औरंगाबाद येथील चार साहित्यसंस्थांनी आपली स्वायत्तता कायम ठेवून समान उद्दिष्टांसाठी 'मराठी साहित्य महामंडळ' स्थापन केले. या महामंडळाचे अध्यक्ष श्री० दत्तो वामन पोतदार होते. संयुक्त महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री म्हणून श्री० यशवंतराव चव्हाण यांनी सूत्रे हाती घेतली होती. नवा प्रागतिक महाराष्ट्र घडविण्यासाठी त्यांनी अनेक उपक्रम सुरू केले. विश्वकोश, साहित्य संस्कृती मंडळ, भाषा संचालनालय हे त्यांतले काही प्रमुख होते. मराठी शुद्धलेखनाच्या नियमांच्या बाबतीत असलेला स्वैरपणा नाहीसा करून तज्ज्ञांमध्ये चर्चा घडवून आणून सर्वांसाठी समान असे लेखननियम तयार करण्याची विनंती त्यांनी श्री० पोतदार यांना केली. पोतदारांनी महामंडळावरील तसेच बाहेरील जाणकारांच्या प्रदीर्घ बैठका घेऊन सर्वांशी विचारविनिमय करून जे नियम तयार केले तेच महामंडळाचे शुद्धलेखनाचे नियम होत. प्रा० रा० श्री० जोग, डॉ० वि० भि० कोलते, डॉ० वा० ना० पंडित, श्री० वा० रा० ढवळे असे अनेकजण नवे नियम करणाऱ्या समितीत होते. ही नियमावली महामंडळाने महाराष्ट्र शासनास सादर केली. हे नियम महाराष्ट्र शासनाने कायदा करून स्वीकारले व सर्वांनी या नियमांचे पालन करावे, असे सुचविले. महाराष्ट्रातील विद्यापीठे, वृत्तपत्रे, नियतकालिके, प्रकाशक तसेच सर्व साहित्यसंस्था यांनी या नियमांचे पालन सुरू केले. त्यामुळे कधी नव्हे; तो सारखेपणा लेखननियमांत आला. शासनाच्या शिक्षण खात्याने शुद्धलेखनाची नियमावली पुस्तिकेच्या रूपात प्रकाशित केली. हे नियम शासनाने स्वीकारले असल्यामुळे त्यांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी शासनाच्या विविध खात्यांची आहे.

(१२) महामंडळाचे नियम प्रचारात आल्यानंतरही जुन्यांचे आग्रही आणि विशेषत: संस्कृत पंडित यांचा विरोधाचा सूर कायम राहिला. 'आलोचना'चे संपादक प्रा० वसंत दावतर यांना अगदी जुने म्हणजे दादोबांच्या काळचे लेखननियमच मान्य असल्यामुळे त्यांनी 'आलोचने'मधील लेखन ज्या जुन्या पद्धतीने चालू ठेवले, ते नियम स्पष्ट करण्यासाठी त्यांनी 'मराठीचे शुद्धलेखन' या नावाचे एक पुस्तकही प्रकाशित केले. 'मराठी तत्त्वज्ञान महाकोशाचे' संपादक प्रा० दे० द० वाडेकर यांना १९३० सालचे म० सा० परिषदेचे नियम मान्य असल्यामुळे त्यांनी तत्त्वज्ञान महाकोशाचे लेखन त्या नियमांनुसार केले. मो० रा० वाळंबे यांनी महामंडळाचे नियम समजावून सांगण्यासाठी अनेक पुस्तके लिहिली; तर डॉ० द० न० गोखले यांनी 'शुद्धलेखन-विवेक' हे पुस्तक लिहून महामंडळाच्या नियमातील विसंगती स्पष्ट केल्या.

(१३) महामंडळाच्या नियमांच्या विरोधात होत असलेली टीका व केल्या जाणाऱ्या अनेक सूचना यांचा विचार करण्यासाठी आणि उपाययोजना सुचविण्यासाठी या क्षेत्रातील जाणकारांची १९८९ मध्ये महामंडळाने एक उपसमिती नेमली. या उपसमितीचे श्री० पु० भागवत, वि० भि० कोलते, भगवंतराव देशमुख, मो० रा० वाळंबे, व० दि० कुलकर्णी, राम शेवाळकर हे सदस्य होते व गं० ना० जोगळेकर हे निमंत्रक होते. त्या वेळी ठिकठिकाणच्या अभ्यासकांकडून शुद्धलेखन-नियमांबद्दल मते मागविण्यात आली. तसेच १९९० मध्ये पुणे, मुंबई, नागपूर व औरंगाबाद येथे संपूर्ण दिवसाची चर्चासत्रे घेण्यात आली. सामान्यत: प्रत्येक ठिकाणी ६० ते ८० अभ्यासकांनी चर्चेत भाग घेतला. येथेही टोकाची मतभिन्नता दिसून आली. मात्र महामंडळाच्या नियमांमध्ये ज्या काही विसंगती राहिल्या असतील तेवढ्या दूर कराव्या व सुधारणेच्या दृष्टीनेच पुढचे पाऊल पडावे या बाजूनेच बहुसंख्य अभ्यासकांनी आपले मत दर्शविले. त्यानंतर शुद्धलेखन उपसमितीच्या दोन बैठका झाल्या आणि शेवटी आहेत ते नियम दृढमूल होण्यासाठी आणखी काही काळ जाऊ द्यावा व नंतर पुन्हा हा प्रश्न विचारात घ्यावा असा निर्णय झाला. उपसमितीने आपला अहवाल महामंडळास सादर केला व महामंडळाच्या त्या वेळच्या अध्यक्षांनी साहित्य संमेलनामध्ये यासंबंधीची माहिती लोकांना दिली.

(१४) जरी या नियमांमुळे सर्वांचे शंभर टक्के समाधान होत नसले तरी आजवरच्या कोणत्याही नियमांपेक्षा महामंडळाचे नियम मराठी भाषेच्या वास्तव स्थितीला धरून आहेत हे तटस्थपणे व पूर्वग्रहविरहित वृत्तीने विचार करणाऱ्या अभ्यासकास मान्य होईल असे म्हणता येते. ■

'महाराष्ट्र आणि मराठी भाषा', परिशिष्ट, पृ० १४३-१४७

# बोलींची अनवट गोडी

**- केशव सखाराम देशमुख**

रुळलेल्या ग्रांथिक भाषेपेक्षा कितीतरी अनवट गोडी ग्राम जनबोलींत आहे. खेड्यांतून मौजूद असलेल्या जिवंत, गोडीयुक्त शब्द आणि वस्तुनाम यांच्या भाषेचा आविष्कार प्रभावी, अनोखा, समृद्ध, प्रसन्न आहे. जसे- भंदं (उष्टे अन्न), ताथं (ताजे), उसऱ्या (वाळवून ठेवलेली फळभाजी), खारोड्या (वाळवून ठेवलेला तिखट पदार्थ), खिरोस (गाय प्रसूत झाल्यानंतर तिच्या पहिल्या कच्च्या दुधापासून बनवला जाणारा पदार्थ), बेल्डीची भाकर (अनेक अन्नधान्यं दळून त्यांची बनवलेली पौष्टिक भाकरी). अशीच स्वयंपाकघरातील वस्तूंनाही बहारदार नावं आहेत. जसे की- गुंडी, तवली (दूध - पाण्यासाठी छोटी घागर), काठोट (भाकरीचे पीठ मळण्याची लाकडाची परात), चाटू (लांब दांडा असलेला चमचा), वगराळं (पाणी माठातून घेण्यासाठीची स्टीलची वस्तू), आधली (धान्य मोजायचं माप, जे पत्र्यापासून बनवलं जात), लाभडं (पीठ, गूळ, पाणी घालून शिजवलेला गोड पदार्थ). याच धाटणीची आशयसमृद्ध शब्दकळा खेड्यांतील स्त्रिया-पुरुषांनी परंपरा जपत जतन केली आहे. भाषा संशोधनातील हा मोठा ठेवा आहे. धडपड्या, तरुण संशोधकांना हा ठेवा उत्तम संशोधन करायला साह्य करणारा आहे.

काही शब्द तर लोकांनी असे जतन केलेले आढळून येतात, ज्यामधून संशोधन, आनंद एकसंध प्राप्त होऊ शकतो. उदाहरणार्थ- 'राग' यासाठी 'टेना', 'वेगानं धावणे' यासाठी 'चिंगाट' किंवा 'झॅ' असे शब्द आढळतात. 'भांडण' शब्दाऐवजी 'उपादी', 'कवंडळ'; 'दुष्ट'ऐवजी 'सतेस', 'मध्येमध्ये बोलणे'ऐवजी 'पचपच', 'विचित्र वर्तन'ऐवजी 'उपितराज', 'वंशनाश'ऐवजी 'बीबूड', 'लाकडी पलंग'ऐवजी 'तकतपोस', 'चादर'ऐवजी 'ढाबळं', 'हातरुमाल'ऐवजी 'दस्ती', 'धूळ'ऐवजी 'धुल्डा' - 'फुपाटा', 'घरातली समोरची खोली'ऐवजी 'डहाळज', 'चामड्याचा नाडा'ऐवजी 'वारती' असे शब्द सर्रास वापरले जातात. शेतीभाती आणि माती संस्कृतीत कृषिकर्म करण्यास अगणित वस्तू रोज वापरल्या जातात. त्यांचा नाममहिमा स्वतंत्र अभ्यास करावा इतका समृद्ध आहे. झोपाटा, कुपाटा, वाडगं, जूपन, शिवळाट, सर्की, बाज, जोडा, थाटली, बींडं, बंधाटी, व्हरका, आगळ, डांबरी, डवरं, दुंडं, मोगडा, आऊत, वसन, इळ्ळत, पास, धूरजड, सुरळ, डालगं, दाताळं, डोमाळं, आरू, इडी, कुसा, टिव्हाळा, हातनी, धांद, चऱ्हाट, विल्डं,





अनुक्रमणिका

येसन, कासरा, दावन या अशा प्रचंड संख्येतील शब्दांनी शेतीची कार्यपद्धती आणि वस्तूंचा संग्रह जतन केलेला आढळतो. लोकजीवनातील ही शब्दकळा खेडुतांचे श्रम, जीवन, भाषा, जगणं आणि त्यांच्या दैनंदिन व्यवहाराचा अनिवार्य भाग आहे. हे जसं बोलीतील भांडार आहे, तसंच ते भाषासंस्कृतीला अर्थवैभव मिळवून देणारं लक्षणीय शब्दांचं कधीच न सरणारं धन आहे. ■

[ 'दै० सकाळ' ]

## सेन्सस आणि सर्व्हे

जनगणनेच्या प्रश्नावलीत भाषेविषयीचे प्रश्न असतात हे खरे. काही वेळा व्यक्तीची मातृभाषा व त्याचबरोबर त्या व्यक्तीस माहीत असलेल्या अन्य एक अथवा दोन भाषांविषयींचे प्रश्न विचारले जातात. परंतु ही माहिती एकत्र केल्यानंतर त्यातून संपूर्ण देशात अथवा एका विशिष्ट राज्यात एखादी विशिष्ट भाषा बोलणारे किती लोक आहेत याचा आकडा मिळू शकतो. उदा० भिली भाषा बोलणारे नव्वद लाख लोक आहेत ही माहिती मिळू शकते शिवाय भिली मुख्यत्वे मध्यप्रदेशात बोलली जाते अशीही माहिती मिळू शकते. परंतु भिली मध्यप्रदेश सोडल्यास गुजरात, महाराष्ट्र, राजस्थान वगैरे राज्यांत पण बोलली जाते अशीही माहिती मिळू शकते. परंतु भिली मध्यप्रदेश सोडल्यास गुजरात, महाराष्ट्र वगैरे राज्यांत पण बोलली जाते ही माहिती या आकडेवारीवरून मिळू शकत नाही. शिवाय लोक ज्याला भिली म्हणतात त्या भाषेतील मूळची भिली भाषेची संपत्ती किती समृद्ध बनत चालली आहे किंवा त्यात किती पडझड झाली आहे ही माहिती मिळू शकत नाही. याखेरीज भिलीमध्ये तृतीयपुरुष एकवचनी सर्वनाम 'तू' हे तद्दन दोन वेगवेगळ्या अर्थांनी वापरले जाते व त्यामुळे 'तू - १' व 'तू - २' अशी दोन तृतीयपुरुषी एकवचनी सर्वनामे भिलीमध्ये आहेत हे जनगणनेच्या माहितीवरून समजणे शक्य होत नाही. थोडक्यात जनगणनेमध्ये 'भाषा बोलणाऱ्या'ची माहिती मिळते परंतु भाषांची माहिती मिळू शकत नाही तशी माहिती मिळविण्यासाठी जी पद्धत वापरण्यात येते, त्याला इंग्रजीमध्ये लिंग्विस्टिक सर्व्हे अशी संज्ञा आहे. येथे सर्वात महत्त्वाची बाब म्हणजे सेन्सस आणि सर्व्हे हे माहिती एकत्र करण्याचे, दोन भिन्न वेगवेगळे प्रकार आहेत.

[ - गणेश देवी, प्रस्तावना, 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण महाराष्ट्र, पृष्ठ तीस' ]

# आदिवासी कातकरी बोलीतील लोकगीते आणि लोककथा

**- नानासाहेब शामराव यादव**

महाराष्ट्रात सह्याद्री, खानदेश, विदर्भ, गोंडवाना आणि मराठवाड्यातील महादेवाच्या डोंगर-कपारीत सत्तेचाळीस आदिवासी जमाती आदिमकाळापासून वास्तव्य करत आहेत. त्यांत प्रामुख्याने वारली, कातकरी, ठाकर, महादेव कोळी, भिल्ल, कोकणा, कोलम, गोंड, कोरकू, मावची या प्रमुख जमाती आहेत. या आदिवासी समूहांचे मौखिक व वर्तनसिद्ध आविष्कार म्हणजे लोकसंगीत, लोकनृत्य, लोकसाहित्य, लोककला, लोकविद्या, लोकजीवन होय. यांतून आदिवासी समाजाची लोकसंस्कृती प्रवाहीपणे संक्रमित होत असते.

आदिवासी कातकरी समूहमनातील गीत, नृत्य आणि नाट्य म्हणजे लोककला केवळ पाहण्याची कला नसून ती अनुभवायची गोष्ट आहे. भारतीय संस्कृतीच्या दुर्लक्षित व उपेक्षित राहिलेल्या या कातकरी सांस्कृतिक अंगाकडे सर्वांचे लक्ष वेधावे, पुढील काळात या मूळ संगीताचे, कलांचे स्वरूप बिघडू न देता त्या कशा वाढतील याचा विचार होणे अत्यंत गरजेचे आहे. आदिवासी संस्कृतीच्या जडणघडणीत निसर्गाचा मोठा वाटा आहे. निसर्गाने आदिवासी जीवनाच्या अंगाअंगावर आपला ठसा उमटवलेला आहे. त्याला कातकरी समाज अपवाद नाही. आदिवासी लोकनृत्याबाबत गोविंद घारे म्हणतात, ''आदिवासींची नृत्ये उत्साही, जोशपूर्ण आहेत. ती विविध रंगांनी नटलेली आहेत. ढोल, मांदल आणि साथीला लोकगीतं असतात. आदिवासींची नृत्ये निव्वळ करमणूक असत नाहीत; ती त्यांच्या जीवनाचे प्रतिबिंब असतात. अन्न आणि श्रम यांच्याइतके त्यांच्या जीवनात नृत्याचे महत्त्वाचे स्थान आहे. त्यांची जगण्याची चाललेली धडपड त्यांच्या नृत्यातून प्रकट होते.''

## आदिवासी कातकरी नृत्य-गीतांचे प्रकार

कातकरी आदिवासी समाजाला स्वत:ची अशी संस्कृती आहे. नृत्यसंगीताच्या धुंदीत जीवनात आनंदभरीत राहण्याचा मार्ग आदिवासींना त्यांच्या संस्कृतीने दिला आहे. कातकरी जमातीची लोकनृत्ये म्हणजे एकत्रित येऊन केलेली नृत्ये, गायन होय.

## सांस्कृतिक मूल्याची जोपासना

जीवनातील वेगवेगळ्या प्रसंगी नृत्य-गीते सादर करून कातकरी समाज आपल्या

सांस्कृतिक मूल्यांची जोपासना करीत असतो. लग्नप्रसंगी कातकरी समाजात करवल्या मोठ्या प्रमाणात गाणी म्हणतात.

''का रं घोड्या चालत नाहीस
पाय भरलं धुराल्यानी
नवरा जातो नवरीसाठी
करवल्या जाती घासासाठी
वाजंत्री जाती दारूसाठी.''

**नमन**

कातकरी समाजात निसर्ग, जमीन, जंगली प्राणी, निसर्गातील जीवसृष्टी व पर्यावरण यांना खूप महत्त्व आहे. कातकरी चेडा, वाघोबा यांची पूजा करतात. पूर्वजांचा आदर करणे आणि पक्षी, प्राणी, नद्या, पर्वत, झाडे वेली यांची पूजा म्हणजे कातकरी धर्म. कातकरी समाजात कोणत्याही शुभ कामाची सुरुवात नाचगाण्याने करतात. शुभ कामात अडचण येऊ नये म्हणून देवीचे 'नमन' गाण्याची पद्धत आहे. त्यापैकी एका नमनाचा प्रकार खाली दिलेला आहे.

''धन्तारीवं तु मानी माता पात्र दिना मै तुज्यावरी वं.
पहिला नमन गाऊ कोनाला गावामां गावने देवाला... धन्तारीवं...
दुसरा नमन गाऊ कोनाला गावामां घरने देवाला.... धन्तारीवं...
तिसरा नमन गाऊ कोनाला गावामां माता पित्याला... धन्तारीवं...
चारवां नमन गाऊ कोनाला गावामां रसिक जनाला... धन्तारीवं...

वरील नमनातून देवांना आवाहन केले जाते आणि चांगल्या कामाची सुरुवात केली जाते. अशा प्रकारचे नमन पूर्वी शेतकरी पेरणी करताना करीत असे. आमच्या शेतामध्ये पेरणीची सुरुवात करताना वडील म्हणायचे, ''म्हसोबा, बहिरोबा, गणेश गणपती लागू सुताला'' अशा प्रकारे देवांची आराधना करून पेरणीला सुरुवात केली जायची. आज मात्र ट्रॅक्टरने पेरणी केली जात असल्यामुळे ही पद्धती बुडलेली आहे.

**जोगवा**

कातकरी समाजात जोगवा गीतही म्हटले जाते. आदिवासीवाडीवरील परशुराम पवार यांनी मला जोगवा गीत ऐकवले, ते पुढीलप्रमाणे :

''चला रं दादा जावं आपुन जोगव्याला आन जावं जोगव्याला
आयना जोगवा मागुला.
आन् ढोल वाल्या ढोल दादा वाजव जोरावर.
आन् वाजव जोरावर आय आनी रं मोरावर.

चला रं दादा आपण जाऊ...
आन खाहळी वाल्या खाहळी वाजव सुरांनी.
आन वाजव सुरांनी आय आनी रं जोरांनी.
चला रं दादा आपण जाऊ...
आन नाचा रं दादा नाचा तुम्ही नाचा रं भोवऱ्यांनी.
आन नाचा रं भोवऱ्यांनी आय आनी रं सगळ्यांनी.

हे गीत नवरात्रींमध्ये आदिवासींच्या वाड्यांवर देवीची स्थापना केल्यानंतर म्हटले जाते. या वेळी कातकरी बाजा वाजवून नाचतात. परंतु हे जोगवा गीत अलीकडच्या काळात म्हटले जाऊ लागले असावे; कारण पूर्वी कातकरीवाड्यांवर देवीची स्थापना केली जात नसे.

### मनोरंजन

पूर्वी त्यांच्याकडे करमणुकीची साधने नसल्याने ते नृत्य-गायनाने मनोरंजन करीत असत. इतर आदिवासींप्रमाणेच कातकऱ्यांमध्येही नाच व गाण्याची परंपरा आहे. आजही अनेक कातकरीवाड्यांवर 'कातकरी बाजा' आहे. नाचण्याची आणि गाण्याची त्यांना मुळातच आवड आहे.

### डेरा नृत्य

कातकऱ्यांमध्ये 'डेरा' हे वाद्य सर्वात महत्त्वाचे आहे. डेरा वाद्याचे वैशिष्ट्य म्हणजे हे वाद्य फक्त स्त्रियाच वाजवतात. डेरा मधोमध ठेवून बायका नाच करतात. आता मात्र ही परंपरा नामशेष होण्याच्या मार्गावर आहे.

### कातकरी समाजातील गाणी :

### 'बांडगी' गीत

नाचताना कातकरी काही गाणी म्हणतात, त्यांपैकी 'बांडगी' गीत पुढे दिलेले आहे.

''डब्बा ढोलकी नावं नाद नाच्या अर्धा नगर गाजं
नाच्या मुहरं नदर कर तट सुपारी नावं.
डब्बा ढोलकी नावं नाद नाच्या अर्धा नगर गाजं
नाच्या मुहरं नदर कर तट नारळी नावं बाग.
डब्बा ढोलकी नावं नाद नाच्या अर्धा नगर गाजं
नाच्या मुहरं नदर कर तट फोपली नावं बाग.

**नाट्य**

आदिवासी समाजात नाट्यपरंपरा आदिम काळापासून अस्तित्वात असून ती सोंगाड्या पार्टी, बोहाडा, खडी गंमत, धांगडीच्या रूपाने आजही जिवंत आहे.

**सोंग**

थकल्याभागल्या जिवांची करमणूक करण्यासाठी कातकरीवाड्यांवर अनेक गोष्टी केल्या जातात. त्यांपैकी एक म्हणजे सोंग होय. यामध्ये सोगाड्या सोंग आणतो तो उपहासात्मकरीत्या बोलून करमणूक करतो. यापैकी सोंगाचा एक नमुना :

''हा नाग्या दादा आमने वाडीमां अनाकोडा आना हा.
हां ज्याम मोठा आहा
तो मां त्याला खावला ओपीहीन बेसुद करी टाका.
नाही तर जो जर जगना तर मानी उंबरी मारुला,
अरं... अरं उठना... उठना...
अं आशनी पूद त्याने अरं... अरं आशनी गांड त्याने अंमऱ्या
वाचव रं डवऱ्या... आशक्या...

**लोककथा**

कातकरी हे महाभारत आणि पुराणातल्या गोष्टी सांगतात; परंतु त्यामध्ये बदल करून गोष्टी सांगितल्या जातात. रामायणातील कथा सांगतानाही त्यामध्ये बदल केला जातो.

कातकरी बोलीत अनेक कथा - दंतकथा आहेत. कथा सांगण्यापूर्वी कथा सांगणारा 'मा यक गोष्ठ आख हं' असे बोलून गोष्ट सांगण्यास सुरुवात करतो. गोष्ट सांगताना सारखे 'मा' असे म्हटले जाते.

**कुक्कर कोलना गोठ**

हेऽऽ पूर्वी हे कुक्कूर आपले घरमा ना ह्यता. रानामा ह्यता. हेऽऽ कुक्कूर वनवासी ह्यता. न कोला अपला ह्यता. कोला पाळीव परानी ह्यता. हेऽऽ कुक्कुर मोठला लबाड. तो यकदीस कोल्या बोलं, कोल्यादा मा गावमा पावना यहं, तू रानमा ज. मा अठं चार दीस रहीन, मंग परत इन.

हेऽऽ... त बा कोला रानामा ग्या. कुकुर गावमा आना. पन कुकुर जो पावना तो अठंज रहा. ग्याच नेहे. तवशी कोला आपली सम्दी पोराबाला लेहे गावापा येहे न हुक हुकी हूहू करं आर्डहं. आपला राज मागंहं. तो कुकुरा बोलहं - मा गावमा यहं, मा गावमा यहं-





अनुक्रमणिका

याप्रमाणेच आणखी एक गोष्ट खाली दिलेली आहे.

## ससा नी कोला नी गोठ

एक मा हता कोला आन एक मा हता ससा. त ते दोनजन ईसा मा आकत चल आपून झाडा लावू. मग ते झाडा मा गोहसत हिडत. कोलाला मा एक तोरीना मा झाड मिळ. मग कोला लेगच मा ससा धावदी जा. आन त्याला मा आक ईहिर माला तोरीना झाड मिलना. ती ससा मा त्याला ईसा आक कोला दादा कटना रं ती तुला झाड मिलना. कोला मा त्याला आकच मा नाही. मग ससा हीडत-हीडत मा जा. तर त्याला बोरीनी मा बुय मीळं. कोला ईसा मा आक बुय तुनी किय रं. नदील माना झाड लावा का लेगच उगील. ससा मा त्याला हेरु आता किय वादह ती. ते दोनजन झाडा लावूला लेगच मा जात. झाडाबिडा मा लावत. कोलाना मा झाड मोठा मा हीना आन ससाना झाड बारीक कोला ने झाडाला तोर यावला सुरवात मा हीना. कोला नी तोर मा पीकनी. आन ससाने बोरीला बारीक-बारीक मा बोरा यावला लागलात. कोला मा तोरीवर चडनार तोर मा खा. ताव ससा मा त्याचा जा आन ईसा मा आक. कोला दादा देरं एक तोर. कोला मा त्याला तोर ओपच मा नाही. मग कोलानी मा तोर उगली जा. आन ससा नी बोर पीक. ससा बोरा खावला बोरीवर मा चडा. ससा मा जाम मा बोरा खा. ताव तट मा कोला मा आन ईसा मा आकं. ससा दादा डेटं एक बोर. ससा आकं थांब हा देता हा. ससा बोर झोडी मा टाक हय्यी केयं ती पाण्यात पडना. ससा मा दुसरा बोर टाक ती गोहावर मा पडना. ससा आक धवीध धवीध. मग कोला मा किवलानाच निधीन जा. हतीती गोट खपनी.

कातकरी जीवनाचा अविभाज्य भाग म्हणजे प्राणी, झाडे, नद्या, डोंगर हे होय. यांचे चित्रण गोष्टीतूनही होताना दिसते. कातकऱ्यांच्या गोष्टी म्हणजे त्यांच्या समूहमनाची ओळख आहे.

■

### संदर्भ

( १ ) गारे, गोविंद, 'आदिवासी लोकनृत्य लय, ताल, सूर' कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ४.
( २ ) रायगड जिल्ह्यातील कातकरी समूहाची मी संकलित केलेली गीते, लोककथा.





अनुक्रमणिका

# आठवणीतली गाणी डॉट कॉम

- श्रद्धा काळेले

आठवणीतील गाणी (http://www.aathavanitli-gani.com), हे मराठीतील गाण्यांच्या खजिन्याच्या स्वरूपात असलेले संकेतस्थळ १५ मे २००३ रोजी कार्यरत झाले. ह्या संकेतस्थळावर मराठीतील वेगवेगळी गाणी ठेवलेली आहेत. ही सर्व गाणी श्राव्य व लेखी स्वरूपात उपलब्ध आहेत. संकेतस्थळावर जाऊन ही गाणी विनामूल्य वाचता वा ऐकता येतात. ह्या संकेतस्थळाची संकल्पना अलका विभास ह्यांची आहे.

ह्या संकेतस्थळावर पहिल्या पानावर डावीकडे अनुक्रमणिका, गीतकार, संगीतकार, स्वर, चित्रपट, नाटक ह्यांनुसार वर्गवारी करून मराठीतील गाणी ठेवलेली आहेत. अनुक्रमणिकेत गाण्यांची त्यांच्या शब्दांनुसार अकारविल्हे वर्गवारी केली आहे. गीतकार, संगीतकार, स्वर ह्या पानांवरसुद्धा नावांनुसार अकारविल्हे वर्गवारी केली आहे. संतवाणी ह्या पानावर तुकाराम, ज्ञानेश्वरी, समर्थ रामदास, विष्णुदास, चोखामेळा, जनाबाई अशी २१ वेगवेगळ्या संतांची वेगवेगळ्या गायकांनी गायलेली पदे आहेत. संपूर्ण गीतरामायणसुद्धा ह्या संकेतस्थळावरून थेट ऐकता व वाचता येते. ह्याचबरोबर मालिकांची गीतेदेखील वाहिनीनुसार विभागून ठेवलेली आहेत. येथे ठेवलेली गाणी फक्त ऐकता येतात. पण ती गाणी उतरवून घेण्याची (डाऊनलोड) सोय नाही.

एका वर्गावर टिकटिकवल्यास त्या वर्गातील सर्व गाण्यांची एक-एक ओळ दिसते. तीवर टिकटिकवल्यास त्या गाण्याबद्दलची माहिती वेगवेगळ्या पोटपानांवरून मिळते. त्या माहितीत गाण्याचे शब्द, गीतकार, संगीतकार, स्वर (गायक-गायिका), चित्रपट, गीतांची संहिता इत्यादी तसेच गाण्यातील विशिष्ट शब्दांचे अर्थ व त्या गाण्याबद्दलची अधिकची माहितीसुद्धा वाचता येते. प्रिंट ह्या पोटपानावर जाऊन गाण्याच्या संहितेची मुद्राप्रतसुद्धा काढता येते. जी गाणी एकाहून अधिक गायकांनी गायली आहेत, ती स्वराविष्कार ह्या पानावर ठेवण्यात आली आहेत.

गीतप्रकार ह्या पानावर संकेतस्थळावरील गाण्यांची २५ गीतप्रकारांत वर्गवारी केली आहे. गीतप्रकारांचे वर्गीकरण हे नाट्यगीते, भावगीते, आणि त्या गीतांचे गट करण्याजोगे विषय निवडून केली आहे. उदा० कृष्ण (गटाचे शीर्षक - ''हे श्यामसुंदर''), आई, विठ्ठल (गटाचे शीर्षक - विठ्ठल विठ्ठल) इ० एखादे गीत एकाहून अधिक गटात जाऊ शकणारे असेल तर ते तसे एकाहून अधिक गटांशी जोडलेले आहे. उदाहरणार्थ ''हे श्यामसुंदर'' ह्या गटात असलेले ''मुरलीधर श्याम हे नंदलाल'', हे पद नाट्यगीते ह्या





अनुक्रमणिका

गटात सुद्धा आढळते. म्हणून शोधणाऱ्या व्यक्तीला कोणत्याही प्रकारे शोधले तरी हवे असलेले पद सापडतेच. सुमारे २५० गीतकारांच्या गाण्यांची त्यांच्या नावानुसार वर्गवारी केली आहे. शंभराच्या वर नाटकांतील वेगवेगळी पदे ह्या संकेतस्थळावर आहेत. 'नवीन भर' ह्या पानावर नुकतीच घातलेली गाणी दिसतात. 'ब्लॉग' येथे संतांच्या रचनांचा तज्ज्ञांनी लिहिलेला भावार्थ लेखी स्वरूपात आहे. तसेच आंतरजाल, वृत्तपत्रे, नियतकालिके इत्यादी माध्यमांतून गीतांविषयी प्रसिद्ध झालेले लेख 'संदर्भ लेख' ह्या पानावर एकत्र करून ठेवण्यात आले आहेत. सध्या ह्या संकेतस्थळावरची गाणी मोबाईलवरून फक्त वाचता येतात; पण ऐकता येत नाही आणि ह्याचे ॲपही नाही. त्यामुळे गाणी ऐकण्यासाठी ह्या संकेतस्थळाला संगणकावरूनच भेट द्यावी लागते. संगणकावरील क्रोम, फायरफॉक्स, इंटरनेट एक्सप्लोअरर ह्यापैकी कोणत्याही न्याहाळकावरून (ब्राउजरवर) ह्या संकेतस्थळावरील गाणी ऐकता येतात.

ह्या संकेतस्थळावर अभिप्राय नोंदवण्याची सोय सुद्धा आहे. अभिप्राय वाचताना असे आढळले की ह्या आठवणीतली गाणी ह्या साठवणीचे अनेक चाहते आहे त्यांत नोकरीनिमित्त वेगवेगळ्या देशात असलेली व्यक्ती वा गाण्याची आवड असलेली पण डोळ्याने दिसत नसलेली व्यक्ती वा ऐकू न येणारी व्यक्ती ह्यांचा समावेश आहे. ह्या संकेतस्थळावर वापरणाऱ्याला नेहमी पडणाऱ्या प्रश्नांची उत्तरे ही नोंदवण्यात आली आहेत. त्यातली एक-दोन उत्तरे वगळता सर्व इंग्रजीत ठेवली आहे. ती मराठीत केली तर बरे होईल. आत्तापर्यंत एकूण १३२४८७८० लोकांनी ह्या संकेतस्थळाला भेट दिली आहे. ह्या संकेतस्थळावर एकूण ३१४३ गाणी आहेत. ह्या संकेतस्थळाचे पान फेसबुकावरही आहे. तेथे जाऊन सुद्धा अभिप्राय नोंदवता येतो. संकेतस्थळावर इ-डाकेचा पत्ता (e-mail) नोंदवून संकेतस्थळाबद्दलचे वृत्तही मिळवता येते.

हे संकेतस्थळ गाण्याचे शब्द माहीत करून घेण्यासाठी, त्यातील शब्दांचे अर्थ समजण्यासाठी, ते थेट महाजालावरून ऐकण्यासाठी आणि तज्ज्ञांकडून त्या गाण्याबद्दल अधिक माहिती मिळवण्यासाठी फारच उपयोगी आहे. एकूण ह्या साठवणीबद्दल बोलायचे झाले, तर अत्यंत सूचिबद्ध मांडणी असलेली ही मराठी माणसासाठी संगीताची मेजवानी आहे. ह्यात खूप-खूप गाण्याची भर पडो आणि समृद्ध होवो आणि जास्तीत जास्त लोक ह्याचा आस्वाद घेवोत हीच एकमेव इच्छा.

■

चलभाष : 9766542256

# नातं कोशकारांशी

- करुणा गोखले

एक माणूस दुसऱ्या माणसाशी विचारांनी जोडला जातो, तो भाषा नामक अद्भुताच्या किमयेमुळं! भाषा हाच स्वत:त एक आद्य अनुवाद असतो. भाषा म्हणजे अमूर्त संकल्पनांचा संवेद्य चिन्हांत ऊर्फ शब्दांत अनुवाद! बोलणारा किंवा लिहिणारा त्याच्या मेंदूतल्या संकल्पना शब्दांमध्ये गुंफून जगापुढं मूर्त रूपात सादर करतो, तेव्हाच त्याच्या विचारांचा पहिला अनुवाद पूर्ण झालेला असतो. मानवी मेंदू जन्माला घालू शकतो, त्या सर्व संकल्पना हीच आद्य स्रोत साहित्यकृती. ती वैश्विक असते म्हणूनच एका उच्चभ्रू, फ्रेंच स्त्रीनं फ्रान्समध्ये बसून रचलेलं संकल्पनाविश्व माझ्यासारख्या पूर्णतया भिन्न प्रतीचं जीवन जगणाऱ्या स्त्रीला परिचयाचं वाटू शकतं. भाषा हे संकल्पनांच्या प्रसारणाचं सर्वांत प्रभावी माध्यम. भाषा नसती, तर या मनीचं त्या मनी सहजी संक्रमित करता आलं नसतं. मात्र, संकल्पना एका भाषेतून दुसऱ्या भाषेत प्रवास करतात, त्यात कोशकारांचं योगदान अमूल्य असतं. कुठलाही अनुवाद करताना मला वारंवार कृतज्ञता वाटते, ती ज्ञात-अज्ञात अशा सर्व शब्दकोशकारांविषयी आणि ज्ञानकोशकारांविषयी. ते नसते तर जग जवळ आलं नसतं. ज्ञान, तंत्रज्ञान, माहिती, विचार या कशाचंही आदान-प्रदान शक्य झालं नसतं. कोशकार नसते, तर परक्या भाषेतलं विचारवैभव अप्राप्य राहिलं असतं. जैविक पातळीवर आपण सारे प्राणिमात्र एका अखंड सूत्रानं जोडलेले असूनही, केवळ भाषाभिन्नत्वामुळं - जगभरातल्या माणसांची प्रजाती एक असतानाही - त्यांच्यामध्ये वैचारिक नातं निर्माणच झालं नसतं. दोन भाषांत पूल बांधणाऱ्या कोशकारांमुळं ते शक्य होतं; परंतु असं असूनही शब्दकोशकारांची स्थिती 'नाही चिरा, नाही पणती' अशीच असते. कुठलंही अनुवादित पुस्तक घ्या, त्यात कोशकारांचं ऋण मानलेले दिसत नाही. एखादा सिसेरो नाहीतर वेब्स्टर यांचे अपवाद सोडल्यास शब्दनिर्मात्यांची प्रतिभा आणि कोशकारांचे डोंगराएवढे श्रम इतिहासात अनुल्लेखितच राहतात. अनुवाद करताना जेव्हा जेव्हा शब्दकोश उघडावा लागतो, तेव्हा तेव्हा माझं तो कोश रचणाऱ्या अनेक अनाम शब्दकर्मींबरोबर एक वैशिष्ट्यपूर्ण नातं जडतं. एखाद्या कर्तृत्ववान पूर्वजानं खूप कष्टानं धनसंचय, पुण्यसंचय करून ठेवावा आणि त्याच्या असंख्य वंशजांना त्याच्या परिश्रमांचा आपसूक लाभ होत राहावा, कधीही न भेटलेल्या आपल्या त्या पूर्वजांविषयी वंशजांच्या मनात उपकृततेची भावना वारंवार दाटून येत राहावी, अशा स्वरूपाचं ते नातं असतं. ■

[ 'सप्तरंग सकाळ', रविवार, दि० ८ मे २०१६ ]





अनुक्रमणिका

# अनुवाद

**- माधुरी शानबाग**

अनुवादासाठी स्रोतभाषा, म्हणजे ज्या भाषेतून आपण पुस्तक अनुवादित करणार असतो ती भाषा, आपल्याला सर्व बारकाव्यांसकट समजायला हवी. त्या संस्कृतीची थोडीफार ओळख हवी. त्यासाठी त्या भाषेतलं भरपूर वाचन हवं. कोणतीही साहित्यकृती लिहिताना लेखक आपल्या मातीसह, संस्कार अन् संस्कृतीसह तीत व्यक्त झालेला असतो. अनुवादकर्त्यानं त्या लेखकाची इतर पुस्तकं वाचली तर सोन्याहून पिवळं. भारतीय भाषांतली पुस्तकं तुलनेनं अनुवादित करणं सुलभ जातं. कारण आपली माती, इतिहास अन् काही प्रमाणात संस्कृती एकच आहे. मात्र इंग्लिश भाषा जगभर पसरलेली आहे; अन् तीत लिहिणारे लोक जगाच्या कानाकोपऱ्यात पसरलेले आहेत.

जगभरातल्या भाषांमधलं उत्तमोत्तम साहित्य इंग्लिश भाषेनं अनुवादाच्या माध्यमातून आणायला फार पूर्वीपासूनच सुरुवात केलेली आहे. त्या भाषेची लवचीकताही अमर्याद आहे. हे सारं उमजून घेतल्याशिवाय मूळ लेखकाला नेमकं काय म्हणायचं आहे, हे समजणं कठीण जाईल. सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे, माती-संस्कृती-वातावरण वेगळं असलं तरी तळातून वाहणारा माणूस नावाचा धागा किती एकसारखा आहे, याचं प्रत्यंतर येतं, तेव्हा अनुवाद करण्याचा अनुभव हा जवळजवळ मूळ लेखनाइतकाच आनंददायी ठरतो. स्रोतभाषेतली पुस्तकं (म्हणजे माझ्यासाठी इंग्लिश भाषेतली उत्तमोत्तम पुस्तकं) वाचत राहाणं हाच ती भाषा नीट समजण्यासाठीचा सर्वोत्तम उपाय आहे.

ज्या भाषेत अनुवाद करायचा, ती लक्ष्यभाषा म्हणजे मराठी... अनुवादकाचा या भाषेतला शब्दसंग्रह भरपूर हवा. त्या भाषेत नीट व्यक्त होता यायला हवं. त्या भाषेत लेखनाची सवय हवी. मूळ लेखन वाचून जे काही समजलेलं असतं, ते नीट शब्दांत मांडता यायला हवं. स्रोतभाषेतल्या वाक्प्रचारांचे-म्हणींचे वाक्यात येतानाचे शब्दांचे बदललेले अर्थ समजायला हवेत. अनुवाद करताना त्यात स्वत:चे विचार घुसडायचा अथवा आपली टिपण्णी करायचा मोह कटाक्षानं टाळायला हवा. हे म्हणजे आपला स्पर्श न होता एका कुपीतलं अत्तर दुसऱ्या कुपीत ओतण्यासारखं असतं. मूळ लेखनातला अर्थ न हरवता अथवा त्यात इतर कोणताही सुवास न मिसळता ही कृती व्हायला हवी. दोन्ही भाषांतलं वाचन भरपूर असलं तर अनुवाद सरस होतो. त्यातही स्रोतभाषा समजली तरी पुरेसं आहे, त्या भाषेतून लिहिता यायलाच हवं, अशी आवश्यकता नसते. ■

[ 'दै. सकाळ', दि० ३० मार्च २०१६ ]





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# प्रबंधलेखकांना दिलासा

- सरोजा भाटे

[ परीक्षित पुस्तक : प्रबंधलेखनाची पद्धती (सुधारित आवृत्ती २री), लेखक : शकुंतला क्षीरसागर, प्रकाशक : युनिव्हर्सल प्रकाशन, पुणे. २०१६. किंमत : रु. १५०/- ]

पीएच०डी० पदवीसाठी सादर केलेल्या प्रबंधांवरून बहिस्थ परीक्षक म्हणून नजर फिरवताना बहुसंख्य प्रबंधांमध्ये प्रकर्षाने आढळणारा संशोधन पद्धतीचा अभाव गेली अनेक वर्षे सातत्याने जाणवत होता. त्यामुळे शकुंतला क्षीरसागर यांचे प्रबंधलेखनाची पद्धती हे पुस्तक पाहिल्यावर दिलासा मिळाला. ते वाचल्यावर त्यातल्या मार्गदर्शक सूचना पाळणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रबंध दर्जेदार निपजतील अशी खात्री वाटली. याआधी प्रबंधलेखनपद्धतीवर पुस्तके नव्हती असे नाही. स्वत: लेखिकेने अशा काही पुस्तकांचा निर्देश केला आहे. तथापि प्रबंधविषयाच्या निवडीपासून प्रबंध सादर केल्यानंतर होणाऱ्या मौखिकी परीक्षेपर्यंतच्या प्रवासात विद्यार्थ्याला ज्या ज्या प्रश्नांना सामोरे जावे लागते त्या सर्व प्रश्नांची यथासांग उकल करणारे आणि तरीही आटोपशीर असे हे बहुधा पहिलेच पुस्तक असावे. लेखिका स्वत: संशोधक, उत्कृष्ट प्रबंधाबद्दल पुरस्काराने सन्मानित आणि पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयासारख्या प्रतिष्ठीत ग्रंथालयात ग्रंथपाल म्हणून प्रदीर्घ अनुभव असलेल्या. त्यामुळे प्रस्तुत विषयातला त्यांचा अधिकार वादातीत आहे. या पुस्तकात प्रबंधविषयाची निवड, त्याच्या अनुषंगाने करायचे वाचन, विषयवैविध्यानुसार बदलणारे अभ्यासविषयांचे तपशील, ग्रंथालयाचा उपयोग, ग्रंथांच्या नोंदी करण्याचे संकेत, अभ्याससाधनांचा यथायोग्य उपयोग, टिपणे करण्याच्या पद्धती यांसारख्या ठळक बाबींबरोबरच प्रबंधाची अक्षरजुळणी, बांधणी आणि प्रस्तुती तसेच संदर्भ देण्याच्या पारंपरिक आणि आधुनिक पद्धती इ० आनुषंगिक पण महत्त्वाच्या विषयांची ही सविस्तर चर्चा आहे. लेखिकेने वेळोवेळी केलेल्या बारीकसारीक सूचना या पुस्तकाचे उपयुक्ततामूल्य वाढवणाऱ्या आहेत. उदा० १९७५ साली स०गं० मालशे यांनी आपल्या पुस्तकात सुचवलेल्या विषयांपैकी फारच थोड्या विषयांवर आजवर संशोधन झाले आहे असे सांगून जुन्या पुस्तकांकडे विद्यार्थ्यांनी दुर्लक्ष करता कामा नये, असे सुचवले आहे. प्रस्तुत विषयावरची लेखिकेची प्रामाणिक निष्ठा आणि तळमळ या पुस्तकाच्या पानोपानी प्रत्ययाला येते. विषय निवडीसाठी ध्यानात घ्यायच्या बाबींमध्ये विद्यार्थ्याची क्षमता, विषयाची व्याप्ती, उपलब्ध साधनसामग्री याबरोबरच पुरेसा वेळ देण्याची गरज या सर्वांचा समावेश लेखिकेने केला आहे. कधी ग्रंथालयात येताना





अनुक्रमणिका

जेवणाचा डबा आणि पाण्याची बाटली आणायला विसरू नये, कारण उपाशीपोटी वाचन होऊ शकत नाही असे आईच्या मायेने लेखिका सुचवते, तर कधी जेव्हा ग्रंथकार ग्रंथावर स्वत:चेच नाव घालतो तेव्हा त्याच्या पित्याचे नाव शोधण्याचा खटाटोप करून त्याची भर घालू नये अशी खबरदारी मार्गदर्शकाच्या भूमिकेतून घ्यायला लावते. संपूर्ण पुस्तकभर संशोधनाच्या वाटेवर अडखळणाऱ्यांना वाट दाखवण्याचे काम लेखिकेने न थकता केले आहे. ज्यांना संशोधन कशाशी खातात हेही माहीत नाही अशा दूरस्थ, ग्रामीण भागातल्या, चाचपडणाऱ्या विद्यार्थ्यांचे बोट धरून त्यांना दर्जेदार प्रबंध सादर करण्याकरता सज्ज करण्याची क्षमता या पुस्तकात आहे.

अनवधानाने राहून गेलेले काही मुद्रणदोष (उदा० टिपा की टीपा?, पृ० ९५वर दोन मात्रांची ै अशी खूण दाखवण्याऐवजी े अशी एका मात्रेची खूण आहे, इ०) वगळता प्रस्तुत विषयावरील हे पुस्तक एक उत्तम, उपयोजकमित्र पुस्तक आहे असे म्हणता येईल. ■

स्थिरभाष - 020-24226854

**इंग्रजी आणि मराठी**

इंग्लिशमधून मराठीत अनुवाद करण्याविषयी बोलायचं झालं, तर इंग्लिश भाषेतले काळ, विभक्ती, शब्दयोगी अव्यय, उपपदं, एकवचन आणि अनेकवचन, लिंगव्यवस्था, वाक्यरचनेची व्यवस्था, कर्तरी-कर्मणी प्रयोग, डायरेक्ट-इनडायरेक्ट स्पीच असा सगळ्याच बाबतींत इंग्लिश व मराठी यांच्यात इतका फरक आहे, की अनुवादकाला याविषयीचं शास्त्रशुद्ध ज्ञान नसेल, तर मोठेच गोंधळ होऊ शकतात.

- लीना सोहोनी, 'दै० सकाळ', रविवार, दि० २१ फेब्रुवारी २०१६





अनुक्रमणिका

## परिषद वार्ता

**- विजया चौधरी**

एक मे हा मराठी अभ्यास परिषदेचा वर्धापन दिन असल्याने, दरवर्षी या दिवशी, परिषदेतर्फे एका विशेष व्याख्यानाचे आयोजन करण्यात येते. यावर्षी, म्हणजे १ मे २०१६ रोजी, संध्याकाळी ६ वाजता, फर्ग्युसन महाविद्यालयाच्या सहकार्याने, सुप्रसिद्ध प्रकाशक श्री० रामदास भटकळ (पॉप्युलर प्रकाशन, मुंबई), यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. परिषदेचे कार्यवाह डॉ० आनन्द काटीकर यांच्या प्रास्ताविकाने कार्यक्रमाची सुरुवात झाली.

आपल्या 'प्रकाशकाच्या नजरेतून' या विषयावरील व्याख्यानात श्री० भटकळ यांनी अत्यंत मोकळेपणाने व पारदर्शीपणाने आपले विचार व्यक्त केले. शालेय वयापासूनच बहुभाषिक असल्याने, आपला प्रकाशन व्यवहाराकडे बघण्याचा दृष्टिकोन 'मराठी प्रकाशक' असा न राहता केवळ 'प्रकाशक' असाच राहिला हे त्यांनी आवर्जून सांगितले. आपल्याकडील प्रकाशकांनी बहुभाषिकत्व स्वीकारायला हवे असे मत मांडून, त्यांनी आपल्या आणि युरोपातल्या समीक्षा-व्यवहाराची तुलना केली. याच मुद्द्याला धरून त्यांनी आपल्याकडील भाषांतर व्यवहाराचीही चिकित्सा केली. त्या निमित्ताने, त्यांनी आपला भाषेकडे आणि भाषांतर-व्यवहाराकडे पाहण्याचा दृष्टिकोन, त्याला असणाऱ्या मर्यादा, योग्य शब्दकोशांची अनुपलब्धता अशा गुणवत्तेशी संबंधित अनेक मुद्द्यांना स्पर्श केला. वाङ्मयीन नियतकालिके चालवण्यासाठी लागणारी व्यावसायिकता आपल्याकडे नाही असे सांगून, अमेरिकेसारख्या प्रगत देशात अनेक विद्यापीठांचे स्वत:चे प्रकाशन-विभाग असतात याकडे त्यांनी लक्ष वेधले. (प्रस्तुत अंकात त्यांनी मांडलेले विचार लेखरूपाने समाविष्ट केले आहेत. वाचकांनी ते मुळातूनच वाचावेत.)

आपल्या अध्यक्षीय समारोपात प्रा० प्र० ना० परांजपे यांनी श्री० रामदास भटकळ यांच्या अत्यंत मुद्देसूद भाषणाची प्रशंसा केली व त्यांच्या विचारांशी सहमती दर्शवताना, मराठी वाचकही गुणवत्तेची अपेक्षा ठेवत नाही अशी खंत व्यक्त केली.

डॉ० काटीकर यांनी केलेल्या आभार प्रदर्शनानंतर कार्यक्रम संपला.

■

चलभाष - 9923671820

# विसाव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त

- विजया चौधरी

मराठी अभ्यास परिषदेची विसावी वार्षिक सर्वसाधारण सभा दिनांक १० जुलै २०१६ रोजी दुपारी ४ वाजता, गरवारे वाणिज्य महाविद्यालय, कर्वे रोड, पुणे येथे घेण्यात आली. पुरेशा गणसंख्येअभावी सभा ४.३० वाजता सुरू करण्यात आली. संस्थेचे अध्यक्ष प्रा० प्र० ना० परांजपे सभेच्या अध्यक्षस्थानी होते. सभेला एकूण अकरा सदस्य उपस्थित होते.

सभेच्या प्रारंभी संस्थेचे कार्यवाह आनन्द काटीकर यांनी उपस्थितांचे स्वागत केले. त्यानंतर २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात दिवंगत झालेल्या मान्यवरांना श्रद्धांजली वाहून सभेच्या कामकाजाला सुरुवात झाली.

कार्यवाह आनन्द काटीकर यांनी एकोणिसाव्या वार्षिक सभेत ठरल्याप्रमाणे, आधी आर्थिक वर्ष २०१३-२०१४चे व त्यानंतर आर्थिक वर्ष २०१४-२०१५चे इतिवृत्त वाचून दाखवले. दोन्ही इतिवृत्तांना सभेची मान्यता घेण्यात आली. श्री० अरविंद नवरे सूचक तर डॉ० नीलिमा गुंडी अनुमोदक होत्या. त्यानंतर कार्यवाह आनन्द काटीकर यांनी वर्ष २०१५-२०१६चे कार्यवृत्त वाचून दाखवले. त्याला सभेची मान्यता घेण्यात आली. सूचक डॉ० विद्यागौरी टिळक होत्या. श्री० अरविंद नवरे यांनी अनुमोदन दिले.

संस्थेच्या कोषाध्यक्ष श्रीमती विजया चौधरी यांनी २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाचा लेखापरीक्षित जमाखर्च व ताळेबंद सभेपुढे सादर केला व उपस्थितांच्या शंकांचे समाधान केले. त्यानंतर त्यांनी २०१६-२०१७ या आर्थिक वर्षासाठीचे अंदाजपत्रकही सादर केले. श्री० नवरे, तसेच डॉ० गुंडी यांच्या सूचनेनुसार संस्थेच्या संकेतस्थळासाठीची तरतूद वाढवण्यात आली. जमाखर्च, ताळेबंद व अंदाजपत्रकाला सभेची मान्यता घेण्यात आली. श्री० अरविंद नवरे सूचक, तर डॉ० नीलिमा गुंडी अनुमोदक होत्या.

त्यानंतर २०१६-२०१७ या वर्षासाठी, लेखापरीक्षक म्हणून ए० जे० दिघे आणि कं० यांची व कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड० पराग देशपांडे यांची नेमणूक करण्यास मान्यता घेण्यात आली. सूचक डॉ० नीलिमा गुंडी व अनुमोदक डॉ० सरोजा भाटे होत्या.

आयत्या वेळच्या विषयांमध्ये, संस्थेतर्फे चालवल्या जाणाऱ्या, 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाच्या प्रकाशनातील अनियमिततेविषयी चर्चा करून त्रुटी दूर करण्याविषयी विचार करण्यात आला.

चहापानानंतर अध्यक्षांच्या संमतीने सभा संपल्याचे जाहीर करण्यात आले. ■

चलभाष - 9923671820

## लेखकांना विनंती

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे, ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतर आधी द्यावे आणि नंतर पदटीप म्हणून इंग्रजी अवतरण द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए०आर०' नको; 'अ०रा०' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी.

लेखकाने आपले लेखन इतरत्र कुठल्याही नियतकालिकात, दैनिकात वा माध्यमात प्रकाशित झालेले नाही, प्रकाशित होण्यासाठी पाठवले गेलेले नाही वा प्रकाशित होण्याच्या प्रक्रियेत नाही, असे स्पष्ट निवेदन करणे आवश्यक आहे.

## संदर्भ कसे द्यावेत ?

संदर्भ देण्याची सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची'मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशीलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.





अनुक्रमणिका

